

**Karmbandhan :** Jayant Bhadang
**कर्मबंधन :** जयंत भडंग



**प्रकाशन क्र. १३०**
ISBN : 81-86152-130-4



**प्रकाशक :**
श्री. अनंत पुराणिक
सुविद्या प्रकाशन,
१४९, शनिवार पेठ, पुणे - ४११ ०३०
M. : 9881065897  Tel. : (020) 24454893




प्लॉट नं. २२७, निर्मल निवास, कानसई सेक्शन, AMP रेल्वेगेटजवळ,
अंबरनाथ (पूर्व), जि. ठाणे, (महाराष्ट्र) पीन कोड : ४२१५०१
Tel. : (0251) 2602048   M. : 9158047857
Email - mayuresh.bhadang@gmail.com



**प्रथमावृत्ती :**  २२ जुलै २०१३ (गुरुपौर्णिमा)



**अक्षरजुळणी :**
का. वि. शिगवण
‘अक्षरवेल’, सी १८, प्लॉट नं. ५७२, दत्तवाडी, पुणे ४११ ०३०.



**मुद्रक :**
श्री गणेश मुद्रणालय
३५७, शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०.



**मुखपृष्ठ :**
मोहन थत्ते, मो. ९८२२४४५५४२



**किंमत : ५०/- रुपये**





# आशीर्वचन



श्री. जयंत भडंग हे गेल्या २५ वर्षांपासून माझे अनुग्रहीत शिष्य आहेत. निष्काम भावनेने साधना करतात. विचाराने तसेच चर्चेने शास्त्र समजावून घेऊन आचरण करण्याची मूळ प्रवृत्ती. आयुष्यातील एका अवघड प्रसंगाला सामोरे जाण्याची वेळ नुकतीच त्यांचेवर आली. त्यामुळे त्यांचे संवेदनशील मन खडबडून जागे झाले. त्यातून कर्मबंधनासारखा अतिशय नाजूक पण परमार्थातील पाया असणारा विषय, त्यांचेकडून हाताळला गेला. तो अगदी साध्या, सरळ, सोप्या आणि सामान्य माणसाला सहज कळणाऱ्या भाषेत. **प्रत्येक माणसाने आपल्या आयुष्यात चांगले वागून सत्कर्म करावे. तेच त्याला परमार्थाची वाटचाल करण्यास प्रवृत्त करतील. हाच प्रस्तुत 'कर्मबंधन' ह्या पुस्तकाचा केंद्रबिंदू आहे.** माझे लेखकाला व ह्या पुस्तकाच्या वाचकांना पूर्णपणे आशीर्वाद आहेत. जन्मोजन्मीचे कर्मबंधन समजून घेऊन परमार्थाची वाट चालणे, अत्यंत महत्त्वाचे आहे.

रामकृष्ण महाराज

(प. पू. रामकृष्ण महाराज)
श्री. स. स. नरसिंहेश्वर महाराज
आध्यात्म आश्रम, यल्लट्टी
ता. जमखंडी, जि. बागलकोट (कर्नाटक)







**वै. सुलभा जयंत भडंग**

जन्म - दि. १५ जानेवारी १९५३

वैकुंठवास- दि. २१ डिसेंबर २०१२

जिला मी जीवन जगण्याची कला शिकवत होतो.
तिनेच मला मृत्युची अनोखी कला दाखवून दिली.
त्या माझ्या प्रिय पत्नीच्या पवित्र आत्म्यास सादर प्रणाम.

**जयंत भडंग**



# प्रस्तावना

**।। श्रीराम ।।**

**ठेविले अनंते तैसेची रहावे।**

**चित्ती असो दयावे समाधान ।।**

वाचायला किंवा दुसऱ्यास उपदेश करायला अत्यंत सोपे पण स्वत: आचरणात आणण्यास कदाचित मृत्यूपर्यंतही अशक्य. असे महत्त्वाचे आणि परमसत्य सूत्र जगत्गुरु तुकाराम महाराजांनी अभंगात सांगून ठेवले आहे. तुम्ही कुठल्याही मार्गाने चालणारे असा किंवा कुठल्याही स्वभावाचे असा, वरील सूत्र आचरणात आणण्यापासून दूर ठेवणाऱ्या घटना, तुम्हाला आयुष्यात सतावणार आहेत.

**तुम्ही पापमार्गी / नास्तिक असाल** तर, प्रचंड ऐहिक प्रगती साधली तरी, कधीतरी तुम्हाला एखाद शेरास सव्वाशेर भेटणार आहे. जो तुमच्या प्रगतीत अडथळे आणेल किंवा जीव व्याकुळ करणारी / व्यग्र करणारी एखादी कौटुंबिक अथवा वैयक्तिक समस्या तुम्हाला ग्रासणार आहे. तुमच्या मार्गात या कशाचीच सोडवणूक करणारी किंवा घटनांचे स्पष्टीकरण देणारी सोय नसणार आहे. **कुठेतरी शेवटी ‘माझ्या बाबतीत असे का ? हा प्रश्न तुम्हाला पडणारच आहे.**

**तुम्ही पापभिरु / सन्मार्गी किंवा आस्तिक असाल** तर दुराचरणी लोकांची ऐहिक प्रगती आणि स्वत:ची मात्र कौटुंबिक जबाबदाऱ्या पार पाडतांना होणारी ओढाताण. साहजिक पावलोपावली

तुमच्यापुढे **माझ्या बाबतीत असे का? यासोबत दैवी व्यवस्थेबाबतच शंका येईल,** असे गंभीर प्रश्न उभे करेल. कारण शास्त्रग्रंथ / सद्‌गुरु वचने / निती वचने यांच्याविरुद्ध वर्तन करणारी मंडळी, तुम्हाला मजेत दिसणार आहेत. आणि तुम्ही मात्र कदाचित ओढाताणीच्या परिस्थितीत असणार आहात!

तुम्ही ज्ञान, माहिती आणि पांडित्याचे आधारे जर, आजकालच्या परिस्थितीचे विश्लेषण करून, स्वस्थितीचे आकलन करू इच्छित असाल, तर संभ्रमावस्थे पलिकडे तुम्ही कोठेच पोहोचू शकणार नाहीत. कारण आधार ग्रंथांच्या आधारे योजलेला आचरणाचा रस्ता आणि कालगतीला धरून व्यवहार बुद्धीचा आचरणाचा रस्ता, यांची दिशाच उलटी आहे. धर्म ग्रंथातील मुल्ये आणि समाज आचरत असलेली व्यवहार मुल्ये, यांची सांगड बसूच शकत नाही. शेवटी तुम्हाला **'असे का?' 'मी आता काय करावे?'** हे प्रश्न स्तब्ध करणारच आहेत.

थोडक्यात काय, तुम्ही आस्तिक असा, नास्तिक असा, सन्मार्गी असा, पापमार्गी असा, विज्ञानवादी असा की दैववादी असा, आयुष्यात वारंवार आलेली परिस्थिती प्रत्येकाला माझ्या बाबतीत असे का? मी काय करावे? काय करणे योग्य राहिल? या अशा संभ्रमित करणाऱ्या प्रश्नांपाशी नेवून ठेवतच असते. आपणच काय, पण सद्‌गुरु-जगत्‌गुरु श्रीकृष्ण ज्याच्याशी सख्य भावाने वागत. जो सर्व शास्त्रांचा ज्ञाता होता. पराक्रमात अजेय होता, असा वीर अर्जुनही अशाच संभ्रमात पडला होता व भगवान श्रीकृष्णाला त्याने विचारणा केली होती.

**कार्पण्यदोषोपहतस्वभाव:**
**पृच्छामि त्वां धर्मसम्मूढचेता:।**
**यच्छ्रेय: स्यान्निश्चितं ब्रूही तन्मे**
**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्॥ गीता २-७॥**

(कायरता ह्या दोषामुळे स्वभाव मारला गेलेला व पालन करण्यायोग्य धर्माविषयी मोहीत चित्त व संमूढ असा, मी आपणास विचारतो की,

माझ्यासाठी जे श्रेयस्कर असेल ते मला सांगा. मी आपला शिष्य असून, आपल्याला शरण आलो आहे. तरी मला उपदेश करा.

प्रश्नांपाशी थबकल्यावर बुद्धीने योग्य वाटलेले उत्तर. त्याप्रमाणे आपण भावी कृती करतो. बुद्धीच्या आधारे घेतलेल्या निर्णयाद्वारे यश आले, तर सहसा आपण ते आपले कर्तृत्व मानतो. जर अपयश आले, तर परत वर उल्लेख केल्याप्रमाणे नवीन प्रश्नांच्या जाळ्यात जाऊन सापडतो.

अर्जुनाच्या प्रश्नाला भगवंतांनी दिलेले उत्तर म्हणजेच भगवद्‌गीता आहे. पुनर्जन्म, कर्ममार्ग व स्थितप्रज्ञता या मुख्य आधारांद्वारे भगवंतांनी अर्जुनाच्या शंकेचे निराकरण करत, त्याचा मोह दूर करण्याचा प्रयत्न केला.

पण सामान्यांच्या मोहाचे काय ? आपल्या समस्या व अर्जुनाच्या समस्या, याची मूळ भूमिका व गाभा बराचसा एक आहे. आपणही संभ्रमित असतो. त्यामुळे भगवंतांनी ज्या साधनाआधारे अर्जुनाचा मोह दूर केला. त्याच साधनाद्वारा आपलाही मोह दूर होऊ शकतो.

पुनर्जन्म, कर्मे, पुनर्जन्माआधारे कर्मबंधने या गोष्टींचा अभ्यास करून, मनाला अनेक गोष्टी समजावून त्याला अनेक भ्रम व मोहातून बाहेर काढून आपले चित्त व बुद्धी स्थिर करता येऊन, आयुष्यात विवेकपूर्ण व योग्य दिशेने वाटचाल करता येणे शक्य आहे.

आयुष्यातील अनेक अनुत्तरीत घटनांचे यथार्थ स्पष्टीकरण व निराकरण फक्त पुनर्जन्म व कर्मबंधनाच्या सिद्धांताआधारेच दिले जाऊ शकते. याचे उत्तम उदाहरण म्हणजे श्रीपाद श्रीवल्लभ चरितामृत. यातील अनेक अध्यायातील अनेक आख्यानात स्वत: सद्‌गुरु श्रीपाद श्रीवल्लभांनी भूत, वर्तमान व भावी घटनांचे कर्मबंधन, पुनर्जन्माच्या आधारे स्पष्टीकरण देऊन भक्तांची जिज्ञासा पूर्ण शांत तर केली आहेच. शिवाय त्यांचे जीवन विषयक दृष्टीकोन प्रगल्भ करून टाकले आहेत. गुरुचरित्रातील काही अध्यायात सद्‌गुरु नृसिंह सरस्वतींनी याच सिद्धांताआधारे घटनांचे

स्पष्टीकरण देऊन काही नास्तिकंचे तोंड बंद केले आहे व आस्तिकंची जिज्ञासा शमवली आहे. सद्गुरु रामदास स्वामीही मनाच्या श्लोकात मनाला समजावताना याच सिद्धांताचा आधार घेतात.

**जनी सर्वसुखी असा कोण आहे।**
**विचारे मना तूचि शोधोनि पाहे॥**
**मनां त्वां चिरे पूर्व संचित कोठे।**
**तयासारिखे भोगणे प्राप्त झाले॥** मनाचे श्लोक - ११॥

आपला आयुष्याकडे बघण्याचा दृष्टीकोन बदलायची ताकद असलेल्या, या सिद्धांताची सुलभपणे माहिती मिळवणे निश्चितच श्रेयस्कर आहे. पण सुलभतेने ही माहिती कशी मिळेल ? गीता, ज्ञानेश्वरी व इतर ग्रंथांची भाषांतरे सामान्यांच्या हृदयात, तत्त्व पटकन सामावेल अशा सोप्या व सरळ भाषेत उपलब्ध नाहीत. प्रवचन किंवा प्रवचन सप्ताहात अति रंजकता किंवा अति दुर्बोधता यामुळे सामान्यांचे हृदय बदलेल, असे काहीच त्यांच्या कानावर पडत नाही. उलट रामदासांनी वर्णन केल्याप्रमाणे

**निरुपणी हे सद्वृत्ती होते।**
**स्थळत्याग होता सवेचि जाते॥**

अशी स्थिती होते. मोठा प्रश्न आहे. पण....

**यदा यदा ही धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्यानं अधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम्॥**

या गीतेतील भगवंतोक्ती प्रमाणे श्री. जयंत भडंग यांच्या **'कर्मबंधन'** या पुस्तकरूपाने भगवंत सुलभ मार्गदर्शनासाठी उभे राहिले आहेत, असे दिसते. लेखकाच्या पाठीशी त्यांचे सद्गुरु प. पू. रामकृष्ण महाराज आणि तपोनिष्ठ व ब्रह्मनिष्ठ अशी सद्गुरु परंपरा आहे. त्यामुळे सदर लिखाण निश्चितच ईश्वरी संकल्प व आशीर्वादातून निर्माण झाले असावे.

लेखकाची गुरु परंपरा नाथ संप्रदायी आहे. पत्नी विरहानंतर आलेली

अंतर्मुखता, त्यानंतर आलेले वैराग्य व कर्मबंधनासारख्या गहन विषयाचे झालेले चिंतन, हे सद्‌गुरु कृपेने लेखकाच्या वेगाने सुरू झालेल्या पारमार्थिक प्रगतीची चाहूल देते. याचवेळी नाथ संप्रदायात प्रसिद्ध भर्तृहरी-गोरक्षनाथ कथेची आठवण येते. पत्नी विरहानंतर गोरक्षनाथांनी राजा भर्तृहरीला बोध देऊन, परमार्थास लावून शेवटी नाथ पदास पोहोचवले होते.

लेखकानीच पुस्तकात नमुद केल्याप्रमाणे पत्नी विरहानंतर लेखकाचे कर्म, कर्मबंधन आदि विषयांवर खूपच चिंतन झालेले दिसते. पण हे चिंतन फक्त स्वत:पुरते मर्यादित न ठेवता सामान्य जनांपर्यंत पोहचवून, त्यांचा लाभ करून देण्याची लेखकाची कळकळ, हे खास नाथ पंथीय वैशिष्ट्य तर दाखवतेच. पण समर्थ सद्‌गुरु रामकृष्ण महाराजांचा त्यांच्या गुरुपरंपरेसकट सामान्य जनावर कृपानुग्रह करायचा संकल्पही दाखवून देते. असे म्हटल्यास गैर धाडस ठरू नये! कारण आपल्याला झालेले ज्ञान सामान्यांच्या भल्यासाठी, त्यांच्यापर्यंत कुठलाही आडपडदा न ठेवता पोहोचवायला पार मत्स्येंद्रनाथांपासून ते ज्ञानेश्वर, एकनाथ महाराजांसकट आजपर्यंतचे सर्व नाथपंथी सद्‌गुरु झटले आहेत आणि झटत आहेत. असो.

कर्माच्या गहन विषयावर लेखकाचे चिंतन तर झालेच आहे. पण जाणतेपणे किंवा सद्‌गुरु कृपेने अनाहूतपणे पुस्तक लिहितांना विषयाची अतिशय सुयोग्य मांडणी झाली आहे. प्रथम सर्वांना समजेल अशा सोप्या भाषेत कर्म, कर्माचे प्रकार इ. समजावून सांगून, मग कर्मबंधन व ते माणसाला कसे बद्ध करते. हे सोदाहरण समजावून दिले आहे. त्यामुळे अवघड विषयही सोपा होऊन सामान्य माणसाच्या बुद्धीच्या आवाक्यात येईल, असा झाला आहे. लेखकाने पौराणिक दाखले देण्यापेक्षा स्वत: अनुभवलेली अगदी आजकालची उदाहरणे, विषयाच्या पुष्टयर्थ दिल्याने माणूस अजूनच गांभीर्याने विषयाकडे पाहू शकतो. विषय आवाक्यात आल्याने निश्चितच तो आत्मसात होऊन, आपले वर्तन

बदलवण्यास मदत करतो.

पुस्तकाचा सर्वात महत्त्वाचा भाग म्हणजे गरुड पुराणाच्या उत्तरार्धाचे सार. हा भाग सहसा एखाद्याच्या निधनानंतरच वाचला जातो किंवा ऐकला जातो. खरं तर पारलौकिक जीवन सुखी करण्याचे मार्ग आणि अनेक कर्मबंधनातून याच जन्मी स्वत:ची सुटका करून घेण्याचा राजरस्ता, भगवंतांनी या भागात गरुडाला समजावून सांगितला आहे. लेखकानी हे सार अत्यंत थोडक्यात पण आशय न गमावता आणि सुलभतेने मांडून, समाजाची एक मोठीच सेवा केली आहे. असे म्हणावे लागेल. वाचकांनी या भागाचे मनन व अनुकरण केल्यास नष्ट होत चाललेल्या, मन:पूर्वक केल्या जाणाऱ्या श्राद्ध आणि दान पद्धतींचे नक्कीच पुनरुज्जीवन होईल. गरुड पुराण हे एकमेव असे पुराण आहे की, जिथे कुठल्याही कथानक शृंखलांचा आधार न घेता, प्रत्येक अध्यायात प्रत्यक्ष मुद्याला हात घालून ज्ञान, माहिती किंवा उपासना पद्धती सांगण्यात आली आहे. पुराणाचा पूर्वार्ध ऐहिक जीवनाला वाहिलेला आहे. तर उत्तरार्ध पूर्णपणे पारलौकिक जीवनाला. कुठेही क्लिष्टता नाही किंवा ''हे आजच्या काळात कसे जमेल ?'' हा विचार मनात आणणारा अवघडपणा नाही. त्यामुळे लेखकाला एक विनंती आहे की, भावी लिखाणात त्यांनी गरुड पुराणातील पूर्वार्धातील सोप्या उपासनांचे मार्गदर्शन याच सुलभतेने लोकांपर्यंत पोहोचवून, त्यांचे ऐहिक जीवन सुखी करण्यास मदत करावी. **कारण दैवी मदतीने ऐहिक जीवन सुखी झाल्यास, थोडी श्रद्धेची वाढ होऊन माणूस थोडा तरी परमार्थाकडे वळायची शक्यता वाढते.**

थोडक्यात म्हणजे योग्य मनन केल्यानंतर तुमची बुद्धी योग्य मार्गावर आणून, अंतत: जीवन सुखी करण्याचे साधन किंवा आजकालच्या भाषेत '**कीट (KIT)**' लेखकाने तुमच्या हाती दिले आहे.

लेखकाची गुरुपरंपरा रेवणनाथ म्हणजेच चमस नारायणांपासून आरंभ होते. मुळात नव नारायणांपैकी चमस नारायणांचे कामच हे होते

की, अश्रद्ध आणि अभक्तांना अभक्तीचे परिणाम सांगून त्यांना सन्मार्गाकडे वळविणे. एकनाथी भागवतात हे खूप विस्ताराने आले आहे. एवढ्यात सद्गुरू भाऊसाहेब उमदीकरांपासून ते सद्गुरू रामकृष्ण महाराजांपर्यंतच्या लेखकाच्या गुरुपरंपरेने हे काम खूपच नेटाने करून, अनेक लोक सन्मार्गास लावून, एक मोठा भक्त समाज निर्माण केला आहे. आणि हे काम जोमाने वाढतच आहे.

या पुस्तकाद्वारे लेखकाच्या सद्गुरुंनी प्रेरणा देऊन, परंपरेच्या कार्यास पूरक असे साहित्य निर्माण करून घेऊन, लेखकाच्या समाजकार्याची वेगळ्या पद्धतीने सुरुवात केली आहे. असे वाटते व परपरंचे नाथकार्य वृद्धिंगत करण्यात लेखकाचा सहभाग वाढवला आहे. असे दिसते.

जास्त काय लिहिणार ? मी पूर्णपणे सामान्य माणूस. भक्ती, ज्ञान व आध्यात्माचा पूर्ण अभाव. पण भगिनीद्वारे परिचय ऐकून, लेखकाला माझ्याकडून प्रस्तावना लिहून घ्यावीशी वाटली. हे आश्चर्यकारक व गूढ वाटले. मध्ये तर अचानक उद्भवलेल्या प्रापंचिक जबाबदाऱ्यांमुळे मी हे काम करू शकणार नाही. अशी परिस्थिती असूनही लेखकाला प्रस्तावनेसाठी थांबावे वाटले. या ईश्वरी लीलेचे अजूनच आश्चर्य वाटले. पण लेखकाचे पुस्तक वाचूनच मी, लेखक व माझी भगिनी यांचे कर्मबंधन लक्षात येऊन जीव शांत झाला. प्रस्तावना लिहिण्याएवढी मोठी जबाबदारी व मान दिल्याबद्दल आणि माझ्यावर विश्वास दाखविल्याबद्दल मी लेखकाचा आणि पर्यायाने लेखकाच्या गुरुपरंपरेचा आमरण ऋणी आहे.

चमस नारायणांपासून सुरू झालेल्या, सुद्गुरू परंपरेने जपलेल्या अणि वृद्धिंगत केलेल्या, या भक्तिप्रसार यज्ञात सद्गुरू रामकृष्ण महाराजांच्या कृपा-छत्राखाली लेखकाचा भरघोस हातभार लागून, त्यांचे उर्वरित जीवन कृतार्थ व्हावे आणि सद्गुरु साईबाबांनी त्यांच्या एका सच्छिष्यास दिलेल्या

**दुष्कर्माची होईल होळी। पुण्यपापाची राखरांगोळी।।**
**पाहिन तुझिया काखेस झोळी। तै तुज भाग्यशाली मानीन।।**
**उपाधीचा होईल त्याग। नित्य भगवद्भक्तीचा लाभ।।**
**तुटतील आशापाश सर्व। तै मी तुज सभाग्य मानीन।।**

या आशीर्वादाची स्थिती लेखकाला सद्गुरुकृपेने लवकरच प्राप्त व्हावी. हीच ईश्वरचरणी प्रार्थना करून प्रस्तावना संपवतो. सद्गुरू माधवनाथ महाराज की जय.

**मंगेश त्रंबक कुलकर्णी**
अमरावती

# अभिप्राय



## ‘श्रीरामनिकेतन’ (केळकर वाडा)

गांवभाग, सांगली येथील प्रभूरामचंद्र व सीतामाई यांच्या प्राचिन मूर्ती

॥श्री राम॥ ॥प्रार्थना॥

आमच्या श्री निंबरगी संपदायातील समर्थ सद्गुरु श्री. भाऊसाहेब महाराज उमदीकर यांच्या परंपरेतील प. पू. श्री. रामकृष्ण महाराज यल्लट्टी यांच्या अंतरंगातील एक सत्शीष्य गु. भ. प. जयंतरावजी भडंग यांनी एक **‘कर्मबंधन’** म्हणून ग्रंथ लिहिला असून तो त्यांच्या पत्नी वै. सुलभा जयंत भडंग यांच्या पवित्र आत्म्यास सादर प्रणाम करून पूर्ण केला आहे. ग्रंथ फार अभ्यासपूर्ण लिहिला गेला आहे.

‘कर्मबंधन’ हे असे एक बंधन आहे, कळले तरी त्यातून सुटता येत नाही. “**जे व्हावयाचे ते व्हावयाचे आणि जे न व्हावयाचे ते कदापी व्हावयाचे नाही.**” असे एक पूर्वीच्या काळी प्रकांड पंडित शास्त्री म्हणत असत. असे माझे पितृदेव ती. प. पू. श्रीदासराम महाराज यांनी त्यांच्या नित्य अखंड कीर्तनात, अनेक वेळा सांगितल्याचे मला आठवते. जे कळण्याजोगे आहे. ते आम्ही कळवून घेत नाही. “**कळे ऐसे नाम कोणी न शोधिती। प्रारब्धाची गती शोधिताती**”॥ **आणि**

''**कळोनिया काय चुकविता नये। ऐसे बळ आहे प्रारब्धाचे**''।। असे माझे आजोबा ती. प. पू. श्री मामा महाराज केळकर म्हणतात. ''**कर्मणा गहनोगती**'' हेच खरे आहे.

पण हे प्रारब्ध बदलण्याचे सामर्थ्य फक्त संत-महात्म्यांच्या जवळ असते. असे जगद्गुरू श्री. तुकाराम महाराज आपल्या बारा अभंगात सांगतात. '**उगवेल प्रारब्ध संत संगे करुनी। प्रत्यक्ष पुराणी वर्णियेली**'।। संत-महात्म्यांना काहीही अशक्य नाही. असे माझे आजोबा ती. प. पू. श्री मामा महाराज केळकर आपल्या नित्य अखंड कीर्तनात सांगत असत.

शेवटी भगवान श्री सद्गुरु तात्यासाहेब महाराज कोटणीस, माझे आजोबा ती. प. पू. श्री मामा महाराज केळकर, माझे पितृदेव ती. प. पू. श्री दासराम महाराज केळकर यांचे चरणी एवढीच प्रार्थना करतो. ''**कळूनही जे चुकविता येत नाही**'' अशा प्रारब्धाच्या मागे माझी वृत्ती न लागता, ''**जे कळवून घेतले तर कळण्याजोगे आहे.**'' अशा नामाच्या ठिकाणी माझे लक्ष लागावे. आणि ''**कर्मयु अमृतम**'' याचे आकलन व्हावे.

शेवटी भगवान श्री सद्गुरु निंबरगीकर महाराज,
श्री सद्गुरु श्री रघुनाथप्रिय साधु महाराज,
श्री सद्गुरु श्री भाऊसाहेब महाराज उमदीकर,
श्री सद्गुरु श्री नरसिंहेश्वर महाराज,
श्री सद्गुरु श्री रामकृष्ण महाराज,
यांचे चरणी अभिवादन करून येथेच थांबतो.
शेष श्रीराम स्मरण।

श्री दादांचा कृपाभिलाषी

चंद्रशेखर

**चंद्रशेखर रामराय केळकर**

'इरामनिकेतन', श्री. बापूरावजी, केळकर वाडा,
गांवभाग, सांगली - ४१६४१६

सांगली,
९ जून २०१३

॥ॐ श्रीनाथ॥
॥श्रीनाथ भगवान नंगेमहाराज की जय॥
॥प. पू. विश्वनाथ महाराज की जय॥
॥स. स. नरसिंहेश्वर महाराज की जय॥
॥प. पू. रामकृष्ण महाराज की जय॥

# लेखकाचे मनोगत

माझ्या आयुष्यतले प्रथम लेखन म्हणजे, माझे सद्गुरु प. पू. रामकृष्ण महाराजांचे जीवन-चरित्र. **भक्त-योग्याची आनंदसाधना** त्याचे लेखन माझ्या सद्गुरूंचे सद्गुरू स. स. नरसिंहेश्वर महाराज यांच्या प्रेरणेने प्रारंभ झाले आणि त्यांच्याच कृपा आशीर्वादाने पूर्ण झाले. त्या ग्रंथाचे प्रकाशन सांगलीतील स. स. नरसिंहेश्वर महाराजांचे मठात, गुरुपौर्णिमा जुलै २०१२ मध्ये झाले. आत्मज्ञानी संतांच्या कृपा आशीर्वादाने, माझ्यासारख्या सामान्य माणसाच्या माध्यमातून निर्माण झालेला ग्रंथ. साहजीकच भक्तमंडळी व अन्य भक्तिमार्गी लोकांना भावला. त्यामुळे मलापण आनंद झाला. लेखक नसल्याने अन्य काही लिहिण्याचे मनात नव्हते.

पण अचानक आणि अल्पावधीत माझ्याकडून लिहिले गेलेले माझे दुसरे पुस्तक म्हणजे "**कर्मबंधन.**" त्याचे प्रेरणास्थान म्हणजे माझी वैकुंठवासी प्रिय पत्नी सुलभा भडंग. ध्यानीमनी नसतांना, चालता-बोलता, ब्राह्ममुहुर्तावर देवाच्या समोर तिला लाभलेला "**यातनारहित सुंदर मृत्यू**" त्या नंतरच्या दहा दिवसात वाचलेले '**गरुड-पुराण**' त्यात भगवान विष्णुंनी गरुडाला समजावून सांगितलेली मनुष्याची

मृत्यूनंतरची गती. परमात्म्याचा अंश असलेल्या जीवाची, जन्मोजन्मीच्या कर्मबंधंनाची साखळी. हे सर्व कर्मबंधंनाचे शास्त्र म्हणजेच कर्माचा सिद्धांत लक्षात आला. प्रिय व्यक्तीच्या अनोख्या मृत्यूने भारावलेले मन काहीसे शांत झाले. संवेदनशील मन विचारात गढून गेले. वाटले, **'गरुड-पुराण'** मनुष्याच्या मृत्यूनंतर का वाचतात ? हे सर्व कर्मबंधन मनुष्याला जीवंत असतांनाच कळायला हवे. वैकुंठवासी सुलभाचा चेहरा डोळ्यासमोर आला. मार्मिकपणे हसत होती. तिनेच मला प्रेरणा दिली. डोळे मिटून सद्गुरु प. पू. रामकृष्ण महाराजांचे स्मरण केले. त्यांनी मनातील विचारांना दृष्य स्वरूप देण्यास मनोमन संमती दिली. सुलभा हे जग सोडून गेल्याला महिना झाला होता.

माझ्या वडिलांच्या पूज्यस्थानी असलेल्या श्रीनाथ भगवान नंगेमहाराज, प. पू. विश्वनाथ महाराज आणि त्यांचे गुरुबंधू प. पू. राजाबाबा. तसेच माझे सद्गुरु प. पू. रामकृष्ण महाराज आणि त्यांचे सद्गुरु स. स. नरसिंहेश्वर महाराज, ह्या सर्व महात्म्यांचे मनोमन स्मरण करून आशीर्वाद घेतले आणि लिहिण्यास सुरवात केली. भराभर सुचत गेले. गरुड-पुराणाचा आधार घेतला. वीस दिवसातच संपूर्ण हस्तलिखित तयार झाले. पुन्हा एकदा सद्गुरुकृपेचा अनुभव आला. यल्लट्टीला जावून प. पू. रामकृष्ण महाराजांचे आशीर्वाद घेतले. त्यांच्या कृपेचा अमृत वर्षाव जन्मोजन्मी माझ्यावर अखंडितपणे व्हावा, अशी परमेश्वर चरणी प्रार्थना. त्यांच्या परवानगीने पुस्तकाची हस्तलिखित प्रत पुण्याच्या सुविद्या प्रकाशनचे मालक व चालक श्री. अनंतराव पुराणिक यांच्या स्वाधिन केली. वै. सुलभा त्यांची मावस बहीण. माझे पहिले पुस्तकपण त्यांनीच प्रकाशित केले होते. नाते व प्रेम ह्यामुळे त्यांनी पुस्तकाचे काम मनापासून केले. त्यांच्या टीममधील श्री. मोहन थत्ते यांनी माझ्या मनातील संकल्पना प्रत्यक्षात आणून तयार केलेले मुखपृष्ठ. अतिशय सुंदर आणि समर्पकपणे कर्मबंधन ह्या विषयाची वाचकांना कल्पना देणारे. अक्षरवेलचे श्री. का.

वि. शिगवण यांनी मनापासून मेहनत घेऊन केलेली सुंदर आणि आकर्षक अक्षरजुळणी. श्री गणेश मुद्रणालयाचे श्री. विक्रम गोगावले यांनी केलेली पुस्तकाची आकर्षक बांधणी. ह्या सर्वांचे मनापासून अभिनंदन करण्यास मला आनंद वाटतो.

चिम्मड संप्रदायाचे श्री. चंद्रशेखर रामराय केळकर, सांगली (अण्णा महाराज) हे स्वत: उत्तम कीर्तनकार. त्यांच्या गांवभाग, सांगली विभागात त्यांची स्वत:ची १०० वर्षांपासून असलेली पवित्र वास्तू म्हणजे "**श्रीरामनिकेतन**" त्या प्राचिन वैभवसंपन्न वाड्यात श्रीराम मंदीर आहे. गेल्या ९० वर्षांपासून श्रीरामरायासमोर अखंड नित्य कीर्तनाची त्यांची वंशपरंपरा आहे. त्यात आज पावेतो एक दिवसही खंड पडला नाही. श्री. अण्णा महाराजांचे साक्षात्कारी आजोबा प. पू. मामा महाराज केळकर यांनी अखंड ३८ वर्षे नित्य कीर्तन सेवा आपल्या हयातीपर्यंत केली. त्या नंतर त्यांचे रामरायस्वरूप तीर्थरूप (वडील) प. पू. दासराम महाराज यांनी ती अखंड नित्य कीर्तनसेवा पुढे ३९ वर्षे केली. त्यांच्या देहपातानंतर गेल्या एक तपापासून ती परंपरा श्री. चंद्रशेखर केळकर उर्फ अण्णा महाराज चालवीत आहेत. नियमाला पण एखादा अपवाद असतो. पण केळकर घराण्याच्या अखंड नित्य कीर्तन परंपरेला मात्र एक दिवस पण खंड नाही. ह्या परंपरेला आदराने नतमस्तक व्हावेसे वाटते. मी पण सांगलीला मुक्कामाला असतांना एक दिवस प. पू. अण्णांच्या कीर्तनाला हजर होतो. अतिशय उत्तम, रसाळ अशा कीर्तनाने माझे हृदय आणि कर्णेन्द्रिये तृप्त झाली. दीड तासांचा वेळ कसा गेला, ते समजलेच नाही. अशा थोर विभुती असलेल्या प. पू. अण्णांनी वेळात वेळ काढून पुस्तकाचे हस्तलिखित वाचले आणि अनमोल असा अभिप्राय प्रदान केला. त्यांचे कृपास्वरूप प्रेम असेच निरंतर माझ्यावर राहो, ही आमच्या दोघांच्याही संप्रदायाचे आदयगुरु प. पू. गुरुलिंगजंगम निंबरगीकर महाराज यांचे चरणी प्रार्थना. सांगली-मिरजच्या प. पू. रामकृष्ण महाराजांच्या भक्तांचे

पण मला सहकार्य लाभले. त्यांचेपण माझ्यावरचे प्रेम कायम राहो.

'**कर्मबंधन**' या पुस्तकास अनपेक्षितपणे लाभलेली श्री. मंगेश कुलकर्णी, अमरावती यांची सुंदर आणि समर्पक अशी प्रस्तावना. ती माझ्याकडे येईपर्यंतचा प्रवास. एक प्रकारचे कर्मबंधनच दाखवून देते. त्यांची व माझी स्वत:ची अथवा स्वरूप संप्रदायातील कुठल्याच व्यक्तीची, प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष अशी कुठलीच ओळख नाही. त्यांची प्रस्तावना ई-मेलवर आल्यानंतर, माझे व त्यांचे मोबाईलवर झालेले विस्तृत बोलणे, हीच प्रथम आणि अप्रत्यक्ष ओळख. ह्या बोलण्यावरून असे वाटले की, त्यांचे, माझे व त्यांची कल्याणची मावसबहीण यासर्वांचे पूर्वजन्मीचे काहीतरी ऋणानुबंध असावेत. ईश्वराच्या ऋणानुबंधाच्या साखळीत आम्ही सर्वजण गोवले गेलेलो आहोत. योग्य वेळी, योग्य व्यक्तींच्या, योग्य कार्यासाठी तो ईश्वर, सुनियोजितपणे गाठी घालून देतो. हेच खरे. पुस्तकाचा विषय पण हाच. त्याच्या सुयोग्य प्रस्तावनेसाठी ईश्वराने नियोजित केलेली व्यक्ती. तिच्यापर्यंत पोहचण्याचा मार्गपण त्यानेच दाखविला.

दुधात साखर म्हणजे मंगेश कुलकर्णी यांची गुरुपरंपरा पण नवनाथांपासून सुरू झालेली. ज्ञानेश्वर माऊलींचे गुरु निवृत्तीनाथ. ज्ञानेश्वर महाराजांपासून सुरू झालेली नाथपंथीय चैतन्य परंपरा पुढे सत्यमल नाथांपासून गुप्तनाथांपर्यंत येऊन पोहचते. चित्रकुटला त्यांची संजीवन समाधी आहे. त्यानंतर ती विठ्ठलनाथ, माधवनाथांपर्यंत पोहचते. प. पू. माधवनाथ हे श्री. मंगेश कुलकर्णी यांचे गुरु. चैतन्यातून मिळालेला अनुग्रह. आमचा स्वरूप संप्रदाय रेवणनाथांपासून सुरू झालेला. नाथपंथाच्या एका शाखेतील एका शिष्याने लिहिलेले पुस्तक. त्याला प्रस्तावना दिली गेली, ती नाथपंथाच्या दुसऱ्या शाखेतील शिष्याकडून. तीपण आधीची काहीच ओळख नसतांना. श्री. मंगेश कुलकर्णी यांचे औपचारिक आभार न मानता, नाथपंथाच्या दोन्ही शाखा जवळ

आल्याच्या आनंदात त्यांना सहभागी करून घेतो.

कर्मबंधन पुस्तकाच्या लिखाणासाठी प्रोत्साहन माझ्या सर्व कुटुंबियांकडून मिळाले. माझे मामेभाऊ श्री. पंकज कुलकर्णी. त्यांच्या धर्मपत्नी सौ. पारुल कुलकर्णी यांनी मागिल पुस्तकाप्रमाणे, ह्या पुस्तकाचे पण शुद्धलेखन तपासण्याचे काम आपुलकीने आणि मोठ्या प्रेमाने केले. आमचे अगदी शेजारीच गेल्या ३५ वर्षांपासून रहाणारे प्रेमळ शिंदे कुटुंबातील श्री. विजय शिंदे ह्यांना फोटोग्राफीचा छंद आहे. नोकरी सांभाळून ते आपला छंद जोपासतात. ते मला मुलाप्रमाणेच आहेत. त्यांनी व माझा मोठा मुलगा चि. मयुरेश यांनी चिकाटीने बसून पुस्तकातील सर्व फोटोंचे एडीटींग अगदी उत्तम रितीने केले. पुस्तकासाठीची सर्व मदत मोठ्या प्रेमाने मयुरेशने केली. तसेच त्याने केलेली आईवरची हृदयस्पर्शी कविता आणि माझ्या वहिनी सौ. शर्वरी शेंबेकर यांनी नात्याने वहिनी असलेल्या पण आपल्या अतिशय प्रिय असलेल्या मैत्रिणीला म्हणजेच वै. सुलभाला वाहिलेली शब्दरूप आदरांजली, अतिशय भावस्पर्शी आहे. ह्या दोन काव्यरुप श्रद्धांजलींनी पुस्तकाची शोभा वाढली आहे. ह्या सर्व प्रेमळ आप्तमंडळींना वै. सुलभाचा अचानक झालेला विरह जाणवतो आहे. तीला सर्वांबद्दल वाटणारी आपुलकी आणि निर्व्याज्य प्रेम, यांना पारखे झाल्याची रुखरुख जाणवते आहे. '**कर्मबंधन**' हे पुस्तक तिला समर्पित करतांना माझ्या मनाची अवस्था मोठी बिकट आहे. पण पुस्तकाच्या रूपाने तिच्या स्मृती अखंड आमच्याजवळ राहतील, ह्यातच आम्हा सर्व कुटुंबीयांना व तिच्या प्रियजनांना समाधान आहे.

प. पू. नंगेस्वामी, प. पू. विश्वनाथ महाराज, प. पू. राजाबाबा, प. पू. नरसिंहेश्वर महाराज व सद्गुरु माऊली प. पू. रामकृष्ण महाराज यांचे आशीर्वाद पुस्तकाच्या सर्व वाचकांना लाभोत व वर्तमान जन्मात प्रेमळ वर्तन, सत्कर्म करण्याची बुद्धी व संत संग यांचा लाभ होवो.

अशी मन:पूर्वक प्रार्थना ह्या सृष्टीच्या नियंत्याला करतो. तसेच माझ्या वै. प्रिय पत्नी सुलभा हिच्या पवित्र आत्म्याला सद्‌गती लाभून मोक्षाप्रतीची तिची वाटचाल सुलभ होवो.

ह्या पुस्तकातील सर्व चांगल्या गोष्टी म्हणजेच सद्‌गुरुंची कृपा आणि अनावधाने राहून गेलेल्या त्रुटी म्हणजेच लेखकाची अल्पबुद्धी. त्यासाठी वाचकांनी क्षमा करावी.

**जयंत पंढरीनाथ भडंग**
अंबरनाथ

# अनुक्रम

# कर्मबंधन

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोस्त्वकर्मणि।।४७।।**

श्रीमद् भगवत्गीतेतल्या दुसऱ्या अध्यायातील सत्तेचाळीसावा श्लोक. भगवान श्रीकृष्ण धर्मयुद्धाच्या निमित्ताने आपल्या आवडत्या शिष्याला म्हणजेच अर्जुनाला, चार वेद आणि सहा उपनिषदांचे सार असलेली गीता स्वमुखाने सांगत आहेत.

**तुझे नियत कर्म करण्याचा तुला अधिकार आहे. पण कर्मफलावर मात्र तुझा अधिकार नाही. तू जे जे कर्म करतोस. त्याचे फळ देण्याचे काम मी करतो. त्या फळाचा अभिमान तू बाळगू नकोस. तसेच तुझे कर्तव्यकर्म तू करित रहा. ते न करण्यामध्ये तू आसक्त होऊ नकोस.**

आपण सर्व सामान्य माणसे. फळाची आशा धरू नकोस म्हणजे काय? आपण तर संसारातील सर्व कर्मे फळासाठीच करतो. किंबहुना कर्माला सुरवात करण्या अगोदरच त्याचे फळ आपल्या डोळ्यासमोर नाचत असते. हा सर्व कर्मयोग आपल्या आकलना पलीकडचा. आचरणात आणण्यास अत्यंत कठीण. पण असे म्हणून चालणार नाही. सामान्य माणसाने सामान्यपणेच त्याचा विचार केला पाहिजे.

**कर्मबंधन** हे सर्व मनुष्य प्राण्याला आहेच. तसेच चौऱ्यांशी लक्ष

योनीतील सर्वच जीवांना ते बंधनकारक आहे. फक्त मानवाला भगवंताकडून मिळालेल्या बुद्धीच्या देणगीमुळे, त्याचा विचार करण्याची पात्रता त्याचे अंगी आहे. **।। कर्म की गती बडी न्यारी ।।** असे मोठमोठ्या संत-महंतांनी म्हटले आहे. आयुष्यभर परमेश्वराचा ध्यास घेतला. काही भवसागर पार करून गेले. पण बहुतेकांना ह्या कर्मगतीने हुलकावणी दिली. **ही कर्मगती, हे कर्मबंधन जन्मोजन्मीचे गाठोडे आहे. हे हळूहळू कमी करत, त्याची गाठ अलगद सोडत सोडत परमेश्वराच्या इच्छेनेच त्याची करूणा प्राप्त करून ते नष्ट करायचे आहे. आणि जन्म-मृत्यूच्या बंधनातून कायमची सुटका करून घ्यायची आहे. साधू-संतांनी त्यालाच मोक्ष म्हटले आहे. त्यासाठी सृष्टीच्या नियंत्याची आराधना, भक्ती निष्काम भावनेने करायला हवी. कर्माचे कोडे उलगडले तर हे सर्व सोपे आहे. अन्यथा महाकठीण.**

## कर्माचा नियम-क्रियेला प्रतिक्रिया

पदार्थविज्ञान शास्त्राचा नियम आहे. ॲक्शन इज इक्वल टू रिॲक्शन. प्रत्येक क्रियेला प्रतिक्रिया ही आहेच. साधा रबरी चेंडू. लहान मुले खेळतांना तो जमिनीवर आपटतात. जमिनीवरून तो वर उसळतो. हळू आपटला, तर हळूच वर येतो. जरा जोराने आपटला, तर तेवढ्याच जोराने वर येतो. आणखी जोर लावला, तर तो आपल्या हातात न येता डोक्याच्या वर जातो. मग टप्प्यांचा खेळ सुरू होतो. चेंडू जास्तीत जास्त आपल्या हातात रहावा म्हणून, मुलगा प्रयत्न करतो. चेंडू जमिनीवर आपटण्याची गती व दिशा ह्यावर नियंत्रण ठेवतो. ज्यायोगे जास्तीत जास्त वेळ चेंडूचा टप्पा आपल्या हातात राहील. **मध्येच नियंत्रण सुटले की, चेंडू हाताबाहेर जातो.**

कर्माचेही अगदी तसेच आहे.आध्यात्मात म्हणा, की जीवनात.

क्रियेला प्रतिक्रिया ही आहेच. **जे पेराल तेच उगवेल. हा निसर्गनियमच. पुण्याचे फळ पुण्यच. पापाचे फळ पापच. परसंतोष ते पुण्य आणि परपीडा ते पाप. अशी संतांनी साधी, सरळ आणि सोपी अशी पाप-पुण्याची व्याख्या केली आहे.** भुकेल्याला दिलेले अन्न, त्याची भूक भागवून त्याच्या शरीराचे तर पोषण करीलच. पण त्याचा आत्मापण संतुष्ट करील. त्या संतुष्ट आत्म्याने दिलेला एखादा आनंदाचा ढेकरपण तुमच्या पुण्यकर्मात भर घालून जाईल. त्याउलट एखाद्या माणसाची निंदा करून, त्याला अपशब्द बोलून त्याच्या मनाला म्हणजेच आत्म्याला दिलेले दु:ख, तुमच्या पापात भर घालील. तो माणूस त्याची प्रतिक्रिया म्हणून तुम्हाला अपशब्द बोलून, तुम्हाला दु:ख देईल. पण त्या माणसाने तुमचे गैरवर्तन सहन केले तर, आनंदाने हुरळून जाऊ नका. तुमच्या क्रियेची प्रतिक्रिया ही होणारच. आज नाही तर, पुढे कधीतरी. ते तुम्हाला भोगावेच लागेल. **ईश्वर हा नुसताच दयाळू नाही. तर तो कर्तव्य-कठोर ही आहे. तुमच्या चांगल्या-वाईट कर्माचे फळ तो देणारच.** एवढा मोठा अचाट असा सृष्टीचा पसारा. असंख्य जीव. पण तो सृष्टीचा नियंता, तुमचे एखादे कर्मपण विसरणार नाही. त्याकडे दुर्लक्ष करणार नाही. हे निश्चित समजा. म्हणून प्रत्येक कृती करतांना सावध रहा. तरच ही कर्मगती, हे कर्माचे गोठोडे तुम्हाला टाकून देता येईल.

## सामान्य माणसाला वाटणारे मृत्युचे भय

**आहार, निद्रा, भय आणि मैथुन. हे चार माणसाचे उपजत गुण आहेत. माणसाच्या प्रत्येक कृतीत एक प्रकारचे भय दडलेले असते. माणसाला सर्वात मोठे भय असते, ते मृत्युचे. प्राचीन ऋषिमुनी आणि आजच्या साधु-संतांनी म्हटले आहे. मृत्यु हा**

**अमरत्वाकडे जाण्यासाठीचा दरवाजा आहे. अमर म्हणजे ज्याला जन्म-मरण नाही तो! जन्म-मरणाच्या चक्रातून जो सुटला, तो अमर झाला. म्हणून मृत्युला न घाबरता त्याचे स्वागत केले पाहिजे. मृत्युचे रहस्य समजावून घेतले पाहिजे. कठोपनिषदात यमधर्माने ते स्वमुखाने नचिकेताला सांगितले आहे. ''यातनारहित सुंदर मृत्यु'' येण्यासाठी परमेश्वराचीच कृपा लागते. त्यासाठी जन्मोजन्मीचे पुण्य आणि परमेश्वराची आराधना करावी लागते.**

मनुष्याला आपला देह खूप प्रिय असतो. त्याचे कारण देहद्वारा उपभोगीत असलेल्या वासना. त्या वासनांच्या उपभोगाने मिळणारे सुख त्याला प्रिय असते. उत्तम खाणे-पिणे, रतीसुख. बंगला-मोटरगाडी, बायको, मुले, आप्तजन यांचे प्रेम. त्यांनी केलेली स्तुती. आयुष्यात कष्टाने अथवा याममार्गाने मिळवलेली संपत्ती. त्यामुळे फोफावलेला अहंकार. हे सर्व सोडून जाण्याची कल्पनाही त्याला करवत नाही. मृत्युमुळे ह्या सर्वांची ताटातूट होणार. हा विचारही त्याला सहन होत नाही. आपल्या आजूबाजूला होत असलेले मृत्यु तो बघत असतो. आप्त आणि परिचितांचे मृत्युचे वेळी तो सांत्वनासाठी जातो. मोठमोठ्या आध्यात्मिक गप्पा तो मारतो. पण आपला स्वतःचा मृत्यु! तो मात्र कधीच येऊ नये असे वाटते. अगदी वृद्धापकाळाने शरीर जीर्ण झाल्यावरसुद्धा. **ह्या सगळ्याचे कारण म्हणजे वासनेचा लोभ. ''कळते पण वळत नाही'' अशी त्याची स्थिती असते. मृत्यु म्हणजे आत्म्याचे स्थित्यंतर. जुनी वस्त्रे टाकून नवीन वस्त्रे परिधान करणे.** हे सामान्य माणसाला कळत नाही. जो माणूस भगवंताची भक्ती करतो. मृत्युचे रहस्य समजावून घेतो. त्याची मात्र ह्या मृत्युच्या भयातून सुटका होते. ब्रह्मदेवाने ह्या सृष्टीची निर्मिती केली आहे. त्यात पृथ्वी, चंद्र, सूर्य असे अनेक ग्रह आहेत. त्या ब्रह्मदेवाचा पण ह्या सृष्टीबरोबर कालांतराने नाश होणार आहे. तो पण अमर नाही. त्याला करोडो वर्षांचा काळ लागेल. तर मानवाच्या क्षणभंगुर आयुष्याचे काय? **मानवाचे आयुष्य म्हणजे समुद्राच्या पाण्यावर**

**निर्माण होणारा आणि क्षणात नाहीसा होणारा पाण्याचा बुडबुडा. हेच त्याचे ह्या ब्रह्मांडातले अस्तित्व.**

## पूर्वजन्म -स्मृती-विस्मृती

भारतीय धर्मशास्त्रात स्पष्टपणे सांगितले आहे. जे पुण्यवान लोक आपले वर्तमान जीवन पावित्र्याने आणि तपस्येने व्यतीत करतात. त्यांना आपल्या पूर्वजन्माचे स्मरण होते. पूर्वजन्माच्या स्मृतीबद्दल गौतम बुद्ध, आदि शंकराचार्य, वामदेव ऋषी, नारदमुनी यांची नावे घेतली जातात. पूर्वजन्मी प्राप्त केलेल्या ज्ञानाची स्मृती, त्यांना ह्या जन्मात होती. त्यामुळे अगदी लहान वयात, त्यांनी ते सर्व ज्ञान आत्मसात केले. तेही अगदी अल्पावधीत. आधुनिक संतपुरुषांमध्ये ज्ञानेश्वर महाराजांचे नाव, त्या संबंधात घेता येईल. बऱ्याचशा संत-महात्म्यांना ह्या जन्मी काहीही अध्ययन न करता, उपजतच ते ज्ञान प्राप्त झाले. तीपण पूर्व जन्माची स्मृतीच म्हणावी लागेल.

बरेचसे आधुनिक तत्त्वज्ञानी शंका काढतात. जर पुनर्जन्म खरा आहे. तर माणसाला पूर्वजन्मीचे काहीच का आठवत नाही? अगदी थोड्या बालकांना पूर्वस्मृती असल्याची उदाहरणे आहेत. परंतु ती अगदी बोटावर मोजण्याइतकी. परंतु ती बालके पूर्वस्मृतीच्या भावविश्वात रमल्याने, वर्तमान जन्मात रस घेऊ शकली नाहीत. त्यामुळे त्यांना आपली भौतिक किंवा आध्यात्मिक उन्नती साधून घेता आली नाही. मानव जीवनाचे ध्येय म्हणजे उन्नती. त्यासाठी पूर्वजन्मीची विस्मृती आवश्यक आहे. आपल्याला वर्तमान जन्मातील भूतकाळातल्या सर्वच गोष्टी आठवत नाहीत. तर पूर्वजन्माच्या कश्या आठवतील! **पुनर्जन्म आणि कर्माचे रहस्य कळून आल्यानंतर, मनुष्याने आपला वर्तमान जन्म पावित्र्याने भगवत्‌भक्तीत व्यतीत केला पाहिजे. आपली**

**आध्यात्मिक उन्नती करून घेतली पाहिजे. त्यामुळेच आपले पारलौकिक जीवन सुखाचे आणि अधिक उन्नतीचे होणार आहे.**

करणी करणारे मांत्रिक भूत-पिशाचांना वश करून, आपला कार्यभाग साधून घेतात. तो लोभापोटी. बरेचसे मानसिक दृष्ट्या दुर्बल असणारे लोक त्यांच्या नादी लागतात. आणि आपला घात करून घेतात. कुकर्म म्हणजे भानामती, करणी सारखे निंद्य कर्म करून असे प्रापंचिक लोक आणि मांत्रिक आपल्या संचितात भर घालतात. मग त्यांची उन्नती कशी होणार?

पुनर्जन्म न मानणारे असंख्य लोक आहेत. वैदिक धर्माचे पालन करणारे, भगवत्‌भक्तीत लीन होणारे अगदी थोडे लोक आहेत. त्यांचाच पुनर्जन्मावर विश्वास आहे.

आज जगाची लोकसंख्या अफाट वाढली आहे. अजूनही वेगाने वाढतच आहे. दरवर्षी एक करोड अशी वाढ धरली. तर दिवसाला अठ्ठावीस हजार आणि तासाला अकराशे चाळीस बालके जन्माला येतात. ती जगातील वेगवेगळ्या देशात. वेगवगेळ्या गावात. कितीतरी भिन्न परिस्थितीत ती जन्माला येतात. कोणाची आई जन्मताच मरते. त्या बालकाचे अत्यंत हाल होतात. आईच्या प्रेमाला तो पारखा होतो. कोणी अगदी श्रीमंताच्या घरात जन्म घेतो. अगदी **सिल्वर स्पून इन माऊथ** अशी त्याची परिस्थिती असते. तो अगदी रूबाबात वाढतो. सर्व प्रकारच्या सुखांचा तो भोग घेतो. तर काही बालके झोपडपट्टीत जन्म घेतात. तीपण वाढतात. पण खायला अन्न नाही. नेसायला वस्त्र नाही. उघडी-नागडीच हिंडतात. पुरेसे शिक्षण मिळत नाही. म्हणून जन्मभर काबाडकष्ट करावे लागतात. काही बालके जन्मताच अनाथाश्रमाच्या दाराशी ठेवली जातात. कुठले प्रेम आणि कुठले सुख!

एका तासात जन्मास येणाऱ्या बालकांच्या परिस्थितीत असा विरोधाभास का? एवढ्याशा बालकांची काय चुक? आईशिवाय वाढलेल्या बालकांची मनस्थिती मी पाहिलेली आहे. मोठी झाल्यानंतर,

आपल्या स्वकष्टाने जीवनात यश मिळवलेली बालके. पण आयुष्यभर जीवनात काहीतरी हरवले असल्याची भावना, त्यांच्या मनातून जात नाही. हे सर्व पाहिल्यानंतर ह्या विरोधाभासाचे कारण शोधू गेल्यास, ते सापडणार नाही. ह्या विसंगतीचा अर्थ लावता येणार नाही.

त्यावेळेस पुनर्जन्माचा सिद्धांत आपल्या डोळ्यासमोर येतो. प्राचीन ऋषिमुनींनी शोधून काढलेले कर्मबंधन आपणास मान्य करावेच लागते. त्या सर्व तासभरात जन्म घेतलेल्या बालकांचे वेगवेगळे प्रारब्धकर्म. हेच त्याचे उत्तर योग्य वाटते. आपणही आपल्या मनाशी विचार करून बघा. ह्यापेक्षा वेगळे काही उत्तर आपणास सापडते काय?

## जगात दिसणारा विरोधाभास

आज सर्वसामान्यपणे आपल्या आजूबाजूला दृष्टी टाकली असता, असे दिसून येते. जगात दोन प्रकारची माणसे असतात. सदाचारी आणि दुराचारी. त्यात सदाचारी लोकांची संख्या कमी असते. सदाचारी लोक प्रामाणिकपणे पैसा मिळवतात. गृहस्थाश्रमाचा अवलंब करतात. आपली पत्नी, मुले-बाळे यांचे पालनपोषण तर करतातच. पण आपल्यातलेच काढून अतिथीचे स्वागत करतात. भगवंताचे भजन, नामस्मरण करतात. जमेल तसा दानधर्मही करतात. परंतु त्यांना स्वकष्टाने मिळणारा पैसा मुबलक नसतो. ओढाताणीत आयुष्य कंठावे लागते. बरीचशी दुःखे त्यांच्या वाट्याला येतात. **अश्या विपरीत परिस्थितीत पण त्यांचे मन समाधानी असते. लोभाला बळी पडून वाममार्गाचा अवलंब ते कधीही करीत नाहीत.**

याउलट दुराचारी लोक स्वतःच्या उद्योगाबरोबरच लाचलुचपत करतात. दुसऱ्याला लुबाडून अमाप पैसा कमावतात. अर्थातच गाडी, बंगला, चैनीची साधने यांची रेलचेल असते. त्यांच्या पत्नी,

मुलाबाळांच्या हाती अमाप पैसा येतो. ते चैन करतात. आपल्या वडिलांचे प्रथमदर्शनी त्यांना कौतुक वाटते. **पण पापाचा पैसा मनुष्याला वाममार्गाकडे घेऊन जातो. तो मनुष्य अत्यंत लोभी होतो. अमाप पैश्यांमुळे त्याचा अहंकार पोसला जातो**. त्याचे सर्व कुटूंबीय वाईट मार्गाला लागतात. तरीपण अमाप पैश्यांमुळे मिळणाऱ्या सुखांचा तो धनी होतो. तो भक्तीमार्गाच्या वाटेला जात नाही. दानधर्म करीत नाही. तो मनातून अशांत असतो. लोभापोटी समाधान नसते.

**सर्वसाधारणपणे विचार केला असता सदाचारी माणूस दुःखी तर दुराचारी माणूस सुखी. असे चित्र दिसते.** ह्या विरोधाभासाचे कारण सामान्य माणसाला समजत नाही. त्यासाठी ईश्वराच्या कर्म सिद्धांताचा विचार केला पाहिजे.

## कर्माचा सिद्धांत अर्थात कर्मबंधन

परमात्म्याने सृष्टीची निर्मिती केली. चौऱ्यांशी लक्ष योनी निर्माण केल्या. सर्वात शेवटी मनुष्यप्राण्याची निर्मिती केली. त्याला बुद्धीची देणगी प्रदान केली. त्याचबरोबर कर्मबंधनाचा नियम त्याला लागू केला. बुद्धीच्या योगाने मनुष्याची विचार शक्ती जागृत होऊन, हे कर्मबंधनाचे कोडे तो सोडवू लागला. प्राचीन काळातील ऋषि-मुनींनी वेदशास्त्रांचा अभ्यास केला. संपूर्ण कर्माचा सिद्धांत, त्यांनी आपल्यासाठी मांडला. त्याचे मनन केले असता, मनुष्य जन्माचे रहस्य आपल्याला कळून येते.

**कर्माचे मुख्य तीन प्रकार सांगितले आहेत. १)क्रियमाण कर्म २) संचितकर्म ३) प्रारब्धकर्म.**

# क्रियमाणकर्म

जन्मल्यापासून माणूस मरेपर्यंत कर्म करीतच असतो. तेच **क्रियमाणकर्म.**

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवश: कर्म सर्व: प्रकृतिजैर्गुणै: ।।५।।**

भगवत्गीतेतील तिसऱ्या अध्यायातील पाचव्या श्लोकात भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात. मनुष्याने प्राकृतिक गुणांपासून प्राप्त केलेल्या त्रिगुणांनुसार, त्याला असहाय्यपणे कर्म करण्यास भाग पाडले जाते. म्हणून कुठलाही माणूस, एक क्षणभर सुद्धा कर्म केल्यावाचून राहू शकत नाही. सामान्य माणसापासून साधु-संतांपर्यंत, सर्वांनाच हा नियम लागू आहे. फक्त कर्म करण्याची प्रत्येकाची पद्धत निरनिराळी आहे.

शरीर धारण करण्यासाठी जे कर्म माणसाकडून सहज केले जाते, **ते सामान्य कर्म.** जसा चोवीस तास नाका-तोंडाने केलेला श्वासोश्वास. तहान लागली असता, हाताने ग्लासात पाणी घेऊन ते तोंडावाटे पोटात घालणे. भूक लागली असता, अन्न खाणे. रोग निवारणासाठी औषध घेणे. इत्यादी सर्व क्रिया सामान्य कर्मात मोडतात. सामान्य कर्माची प्रतिक्रिया ही सामान्यच. म्हणजे पाणी पिण्याने तहान भागणे. अन्न खाल्ल्याने भूक भागणे. शरीराचे पोषण होणे. औषधाने रोग निवारण होणे. अशा अनेक क्रिया सहजतेने माणसाकडून होत असतात. ह्या सर्व क्रियांचे फळ संचितात जमा होत नाही.

मात्र तहानलेल्या माणसाला पाणी न देता, ते आपण पिणे. दुसऱ्याच्या हक्काचे अन्न, त्याच्याजवळून हिसकावून घेऊन ते आपण स्वत: खाणे. ते कुठल्याही पद्धतीने असो. जसा गरीबाचा पैसा लुबाडून त्याला अन्नापासून वंचित ठेवणे. आपण मात्र त्या पैश्यांवर मिष्टांन्नाचे भोजन करणे. **हे पापकर्मात मोडते. त्याचे फळ आपल्याला कधीतरी**

**भोगावेच लागणार. हे पापकर्म आपल्या संचितात जमा होते.** पण आपण आपल्या अन्नातून अतिथीला अन्न दिले. भुकेल्या माणसाचा आत्मा तृप्त केला. **तर ते पुण्यकर्म. त्याचे फळ आपल्याला लगेच नाही, तर पुढे कधीतरी मिळेल. ते आपल्या संचितात जमा होईल.** अशा कितीतरी गोष्टी सांगता येतील. हे फक्त एक उदाहरण म्हणून सांगितले. आपणा सर्वांना रोजच्या आयुष्यातील ह्या छोटछोट्या गोष्टी माहीत आहेत. विचाराअंती आपणच ठरवू शकतो. पाप कोणते आणि पुण्य कोणते?

ही इतकी छोटीछोटी कर्मे. त्यांचे पण फळ भविष्यात भोगण्यासाठी आपल्या संचितात जमा होते. ते आपणास कसे भोगावे लागते. ते पुढे पाहू. मोठमोठे चोर-दरोडेखोर, राजकारणी, लाचलुचपत करणारे अधिकारी, पेशंटला लुबाडणारे डॉक्टर, लबाडी करणारे व्यापारी, पैशाकरीता आध्यात्माचा खेळ मांडणारे भोंदू साधु-संत. ह्यांची गोष्टच वेगळी. त्या सर्वांचे क्रियमाण कर्म, त्यांच्या न कळकत संचितात जमा होत असते. त्याच्या निवारणा करिता थोडाफार दानधर्म करून भागत नाही. **एकाच माणसाचे संचिताचे दोन भाग परमेश्वराने केले आहेत. एक भाग पुण्याचा. दुसरा भाग पापाचा.** पुण्याचे फळ सुख. आणि पापाचे फळ दु:ख. माणसाने केलेले पुण्य, पुण्यसंचितात जमा होते. तर पापकर्म पापसंचितात जमा होते. एखाद्याने केलेले क्रूरकर्म. त्याच्या निवारणासाठी केलेल्या दानधर्माने, त्या क्रूरकर्माचे फळ कमी होत नाही. त्याचे फळ त्याच तीव्रतेने भोगावे लागते. त्यासाठीच ते संचितातील पापाच्या विभागात जमा होते. त्या क्रूरकर्मी माणसाने केलेला भरपूर दानधर्म. पण तो पूर्णपणे पुण्यसंचितात जमा होत नाही. कारण त्या दानधर्मामागचा हेतू वाईट असतो. परमेश्वराला सर्व समजते. तो त्या दानधर्माने संतुष्ट होत नाही. परमेश्वर त्याला माफ करीत नाही. **कर्मफळात वजाबाकी नसते. फक्त बेरीजच असते.** अति सूक्ष्म असलेला, हा कर्माचा सिद्धान्त सामान्य नियमात बसत नाही. त्याचा विचार निराळ्या रितीने करावा लागतो. हे कर्मबंधन विचारवंत साधू-संतांकडून समजावून घेतले, म्हणजे सोपे पडते. कुठले कर्म पापकर्म आणि कुठले कर्म

पुण्यकर्म? ह्यावर चर्चा करीत बसायचे नाही. **कुठलेही कर्म करण्याआधी आपल्या अंतरमनाला विचारा. तोच ह्याचे उत्तर देईल. पण आपण त्याचे ऐकले पाहिजे. परमेश्वराने त्यासाठीच मानवाला बुद्धी दिली आहे. पण एकदा का माणसाची बुद्धी भ्रष्ट झाली, की अंतरमनही बोथट होते.**

## संचित कर्म

अनेक जन्मात क्रियमाण कर्माद्वारे आपण कमावलेला बँक बॅलन्स म्हणजे संचित कर्म. त्याचेपण दोन वेगळे अकाऊंट आहेत. पापाचा वेगळा. पुण्याचा वेगळा. हा सर्व सूक्ष्म कर्मांचा हिशेब परमेश्वराकडे असतो. केवढे कठीण काम हे ! पण सृष्टीच्या नियंत्याची शक्तीच अगाध. असंख्य माणसे. त्यांची असंख्य कर्मे. **ह्या संचितकर्मांच्या खात्यावर पूर्णपणे परमेश्वराचे नियंत्रण असते. त्यातून कोणताही भाग आपणास स्वत:हून काढता येत नाही. मनुष्याच्या प्रत्येक जन्मातील क्रियमाण कर्म त्याच्या संचितात जमा होत असते. म्हणून आपण वर्तमान जन्मात निष्काम कर्म केले पाहिजे. जेणे करून आपल्या संचितात भर पडणार नाही.**

## प्रारब्धकर्म

लहानपणापासून हा शब्द असंख्य वेळेस आपल्या कानावरून गेला आहे. शेजारपाजारचे अगदी गरीबाचे उघडेनागडे अशक्त पोर पाहिले म्हणजे, एखादी माता करूणेने विव्हळ होते. म्हणते, कुठले एवढे जड प्रारब्ध घेऊन जन्मलास तू ! लगेचच आपल्या मुलांबरोबर त्या लहानश्या जीवाला जेवू घालते. कपडे-लत्ते देते. आपल्या शान-शोकीत वाढलेल्या

मुलाला मोठ्या शाळेत घालते. शिकवण्या लावते. तरी पण अभ्यासात त्याची प्रगती होत नाही. ती माता वैतागून जाते. आपल्या कपाळावर हात मारून घेते. म्हणते, मेल्याच्या प्रारब्धातच नाही. तर कुठला शिकणार?

हे सर्व प्रारब्ध म्हणजे काय? **जीव असंख्य पशु-पक्षी इ. योनीतून कर्मफळे भोगत भोगत, मनुष्य जन्माला येतो. तो परमेश्वर कृपेनेच. त्यावेळेस त्याचे संचितातील पापकर्मे आणि पुण्यकर्मे जवळ जवळ सारखी असतात. परंतु सर्व संचित तो काही एका जन्मात भोगू शकत नाही. म्हणून संचितातला काही भाग (पाप-पुण्य दोन्ही) परमेश्वर प्रारब्ध म्हणून ह्या जन्मात मनुष्याला भोगण्यास प्रदान करतो.** जसे हजार रुपये, आपल्या संचितातील खात्यात शिल्लक आहेत. ते एकदम आपल्याला मिळणार नाहीत. कारण ते भोगण्यासाठी सर्वसाधारण माणसाचे ७०-८० वर्षांचे आयुष्य पुरणार नाही. त्यामुळे परमेश्वर त्यातील १०० रुपये ह्या जन्मात आपणास प्रारब्ध म्हणून भोगण्यास देईल. त्यात पाप आणि पुण्य, ह्या दोघांचाही भाग असेल. कोणी पापाचे फळ आधी भोगेल. नंतर पुण्याचे. तर कोणी पुण्याचे फळ आधी भोगेल. नंतर पापाचे. कधी कधी मिश्रित फळ तो भोगेल. हे सर्व ठरवणारा परमेश्वरच आहे. **त्यामुळेच जगात एकाच वेळी सर्व माणसे सुखी. तर एकाच वेळी सर्व दु:खी. अशी दिसणार नाहीत. कोणी सुखी. तर कोणी दु:खी. असेच चित्र ह्या दुनियेत दिसेल.** कर्मसिद्धांताचा विचार केला असता, ह्या सर्व गोष्टींचा आपणास उलगडा होईल.

मनुष्य जन्मात आल्यावर प्रत्येकाने आपली उन्नती करून घ्यावी व मोक्षाप्रती वाटचाल करावी. अशी परमेश्वराची इच्छा असते. त्यासाठी सर्व संचित संपायला वरील हिशेबाने दहा जन्मे लागतील. ती पण प्रत्येक जन्मात आपल्या पापकर्मांने संचितात भर घातली नाही तर! **मोक्ष मिळण्यास किती जन्म लागतील, याचा विचार न करता**

**मोक्षाप्रतीची वाटचाल श्रद्धेने आणि योग्य मार्गाने चालणे. हेच नरजन्माचे कर्तव्य म्हणा किंवा सार्थक म्हणा. तो दयाळू परमेश्वर योग्य मनुष्याला मदतीचा हात नक्कीच देईल. त्याकरिता ईश्वरासाठीच ईश्वराचे नामस्मरण, भक्ती करणे आवश्यक आहे.**

**चांगले सद्गुरू मिळणे. त्यांचे योग्य मार्गदर्शनाने भक्ति-मार्गाचा, योगमार्गाचा अवलंब करणे. हे पण प्रत्येकाच्या प्रारब्धानुसार प्राप्त होते. सर्वांनाच काही सद्गुरू लाभत नाहीत.**

## मानव जन्माची महानता

सर्व शास्त्रांमध्ये मानव जन्माची महानता वर्णन केलेली आहे. **मनुष्याचे शरीर हे सर्व योनीत श्रेष्ठ मानले गेले आहे. मनुष्ययोनी ही कर्मयोनी आहे. तसेच भोगयोनी पण आहे.** येथे मनुष्य प्रारब्धानुसार भोग तर भोगतोच. पण त्याचबरोबर बुद्धीच्या देणगीमुळे योग्य विचार करू शकतो. विचारांमुळे योग्य आचारांनी भगवतभक्ती करून, सुकर्माने आपली उन्नतीपण करून घेऊ शकतो. परंतु रजोगुणाने निर्माण झालेला लोभ. मनुष्याची विचारशक्ती नष्ट करतो. लोभापासून मोह. मोहापासून काम, क्रोध, अहंकार, मत्सर इत्यादी दुर्गुण मनुष्याला आपसूक येऊन चिकटतात. त्यांच्या प्रभावामुळे मनुष्य निचकर्मे करण्यास प्रवृत्त होतो. निचकर्मे केल्यानंतरही त्याला काहीच वाटत नाही. तो त्यांचे समर्थनच करीत असतो. सैतानाने मनाचा ताबा घेतल्यावर, ह्याशिवाय वेगळे ते काय घडणार? हीच माणसाची कर्म-योनी. संचित कमी करायचे! का त्यात भर घालायची! हे सर्वस्वी त्याच्यावर अवलंबून आहे. मानव जन्म हा परमेश्वराच्या कृपेनेच मिळतो. तो उन्नती साधण्यासाठीच. त्यात साधु-संतांच्या संगतीने, त्यांच्या सहवासाने व मार्गदर्शनाप्रमाणे भक्ती, कर्म, योग व ज्ञान ह्या चारपैकी कोणत्याही मार्गाचा अवलंब करून,

मनुष्य मोक्षाप्रत जाऊ शकतो. पण जगातील नव्वद टक्के लोक लोभाच्या प्रभावामुळे ह्या मार्गाचा अवलंब करीत नाहीत.

मानव जन्मात केलेली पुण्यकर्मे भोगण्यासाठी, देवलोकात म्हणजेच स्वर्गलोकात आत्म्याची रवानगी केली जाते. **पण देवयोनी ही कर्मयोनी नाही. फक्त भोगयोनी आहे. त्यामुळे पुण्यकर्मे संपुष्टात आल्यानंतर उन्नतीसाठी परत मनुष्य जन्मातच यावे लागते.** तसेच घोर पापकर्माचे फळ भोगण्यासाठी आत्म्याला नरकात जावे लागते. तेथे दारूण दु:ख भोगावे लागते. तेथे उन्नती नाही. तसेच छोट-छोट्या पातकांसाठी पशु-पक्षादी योनीत जन्म होतो. तीपण भोगयोनीच. तेथेपण उन्नती नाही. ही सर्व पातकांची फळे भोगल्यानंतर, तो दयाळू परमेश्वर पुन्हा मनुष्यजन्म देतो. तो खूप कालावधीनंतर. वर्तमान जन्मात सत्कर्माची वाट चोखाळली नाही, तर पुन्हा दुर्गती. पुन्हा नरक. पुन्हा पशु-पक्षादी योनी. ह्या जन्म-मृत्युच्या चक्रातून बाहेर येण्यासाठी, मनुष्य योनीचीच आवश्यकता आहे. **मानवाने विचारपूर्वक ह्या चक्रातून बाहेर यायलाच पाहिजे. कर्मबंधनाचे गाठोडे सैल केलेच पाहिजे. त्यासाठीच कलियुगात परमेश्वर संत-महात्म्यांच्या रूपाने अवतीर्ण झाला आहे. त्यांच्या आश्रयाला जाण्यातच आपले हित आहे.**

भगवान श्रीकृष्ण भगवत्‌गीतेत स्पष्टपणे सांगतात.

**सत्वगुणाने युक्त असलेल्या पुरुषाची सत्कर्मे, त्याला स्वर्गादी उच्च लोकात घेऊन जातात. रजोगुणात स्थिर असलेल्या पुरुषाची मिश्र कर्मे, परत त्याला मनुष्यजन्म प्रदान करतात. तर तमोगुणाने कार्यरत असलेला पुरुष अधोगतीला जातो.** कीटक, वृक्ष, पशु-पक्षादी योनी त्याला त्याच्या कर्मानुसार प्राप्त होतात. येथे पुरुष म्हणजे मानव. स्त्री-पुरुष दोघेही. तसेच श्रीकृष्ण पुढे म्हणतात. देवतांचे पूजन करणारे देवलोकात जातात. तर पितरांचे पूजन करणाऱ्यांना पितृलोक प्राप्त होतो. तसेच भूत पिशाचांचे पूजन करून त्यांचेकडून आपल्या इच्छा पूर्ण करून घेणाऱ्या लोकांना, भूत-पिशाचांची योनी मिळते. **परंतु जे**

**माझे भक्त निर्हेतूकपणे माझेच पूजन करतात. त्यांना मी वैकुंठलोकाला घेऊन जातो. मुक्ती प्रदान करतो. विनासायास त्यांची जन्म-मृत्युच्या फेऱ्यातून सुटका होते.**

## निष्काम कर्म

मनुष्य जन्म हा कर्मप्रधान आहे. येथे क्रियमाण कर्म होणारच. क्रियमाण कर्माचे फळ भोगण्यासाठी, त्याची भर संचितात पडणारच. मग ह्या कर्मबंधनातून आपली सुटका होणार कशी?

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसच्छिन्नसंशयम ।**
**आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।।४१।।**
**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगत्यक्त्वा करोति यः ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ।।१०।।**

भगवान श्रीकृष्ण चौथ्या अध्यायातील एक्केचाळीसाव्या श्लोकात सांगतात. **आपल्या कर्मफलांचा त्याग करून जो मनुष्य भक्ती-योगयुक्त कर्म करतो आणि दिव्य ज्ञानाद्वारे ज्याचे सर्व संशय नष्ट झालेले आहेत. तो कर्मबंधनांनी बद्ध होत नाही. तसेच भगवंत पुढे पाचव्या अध्यायातील दहाव्या श्लोकात म्हणतात. जी व्यक्ती कर्मफळ भगवंताला समर्पित करून आसक्ती न ठेवता कर्म करते. ज्याप्रमाणे पाण्यात राहूनही कमलपत्राला पाण्याचा स्पर्श होत नाही. त्याचप्रमाणे जगात राहूनही पापकर्मे त्या व्यक्तीला प्रभावित करू शकत नाहीत.**

अशा तऱ्हेने निष्काम कर्म करणारा भगवतभक्त पुण्य फलांपासून पण दूर राहतो. पापकर्माने तो प्रभावित होत नाही. त्यामुळे पापकर्मांच्या फळाचा पण प्रश्न नाही. पुण्याचे फळ नसल्याने स्वर्गलोकात जाण्याची

वेळ येत नाही. सकाम पुण्यकर्म असेल तर, कर्मबंधनानुसार त्याचेपण फळ भोगावेच लागते. त्याशिवाय मुक्ती नाही. वर्तमान जन्मात अशा तऱ्हेने सर्व कर्मे भगवंताला अर्पण करून, आपण स्वत: त्यांच्या फळापासून दूर रहाणारा माणूस, संचितात भर घालीत नाही.

## संत-महात्म्यांची गती

**पूर्वीच्या कित्येक मनुष्य जन्मात, सत्कर्माने-भगवत्‌भक्तीने मानव उन्नती करत करत मोक्षाची वाट चालत असतो. त्याचे फलस्वरूप म्हणजे परमेश्वर कृपेने परत परत मनुष्य जन्माची प्राप्ती करून घेतो. शेवटी त्याला सद्‌गुरूकृपेने आत्मज्ञानाची प्राप्ती होते. त्याच मनुष्यास आपण संत-महात्मा म्हणतो.** गेल्या अनेक जन्मांच्या पुण्याने तथा निष्काम कर्माने त्याचे संचितकर्म जवळ जवळ संपलेले असते. आत्मज्ञान प्राप्तीने उरलेले संचितपण दग्ध होते. क्रियमाण कर्म निष्क्रीय होते. म्हणजेच त्याची भर संचितात पडत नाही. तो जीवनमुक्त होतो. परंतु प्रारब्धकर्म मात्र शिल्लक असते. महात्मा ते भोगूनच संपवतो. त्या शिल्लक आयुष्यात तो स्वत: साधन तर करतोच. पण अनेकांना भक्तीमार्गाला लावून, त्यांचेही कल्याण करतो. प. पू. रामकृष्ण परमहंसांना गळ्याचा कॅन्सर होता. संत तुकाराम महाराजांना जीवनात तीव्र दारिद्र्याला तोंड द्यावे लागले. अशी अनेक उदाहरणे आपल्या डोळ्यासमोर आहेत. पण त्या संत-महात्म्यांनी आपले प्रारब्धभोग आनंदाने भोगूनच संपविले. त्यांच्या निवारणासाठी कधीही परमेश्वराला प्रार्थना केली नाही. परमेश्वर कृपेने त्या प्रारब्ध भोगांचे निवारण झालेही असते. पण ते भोगण्यासाठी त्यांना पुन्हा जन्म घ्यावा लागला असता. **हे सर्व कर्मबंधन त्यांना ज्ञात होते. प्रारब्धभोग संपल्यानंतर त्यांनी परमेश्वराच्या इच्छेनेच देह ठेवला आणि ते विदेहमुक्त झाले. अशा तऱ्हेने क्रियमाण,**

**संचित आणि प्रारब्ध अशा तीनही प्रकारच्या कर्मांचा लय झाल्याने, त्यांना जन्म-मरणाचे प्रयोजनच राहिले नाही. ते पूर्णपणे मुक्त झाले. त्यांचा आत्मा परमात्म्यात विलीन झाला.**

प्रत्येक मनुष्याला ह्या चक्रातून जावेच लागते. सद्गुरूकृपेने मोक्षाचा मार्ग चालण्यास सुरवात केल्यानंतर, ह्या जन्मी आपण कुठल्या टप्प्यावर आहोत. हे भक्तिमार्गी मनुष्यास समजत नाही. त्यामुळे त्याच्या मनात नेहमी शंका येते. मी अमुक इतका जप करतो. ध्यान करतो. तरी मला परमेश्वराची प्राप्ती का होत नाही? हे सगळे सोडून द्यावे काय? पण आत्मज्ञानी संत-पुरुष यांना हे सगळे ज्ञात असते. भूत-भविष्य यांचे त्यांना परमेश्वर कृपेने ज्ञान होते. ते आपल्या भक्ताला हा कर्माचा सिद्धांत समजावून सांगतात. ही सगळी गोष्ट एका जन्मात साध्य होण्यासारखी नाही. त्यासाठी अनेक जन्मातील प्रयत्नांची गरज असते. प्रत्येक जन्मात संचितातील थोडेथोडे प्रारब्ध घेऊन, ते भोगूनच संपवावे लागते. हे सर्व परमेश्वराच्या इच्छेनेच घडते. फक्त वर्तमान जन्मात क्रियमाण कर्मातून संचितात भर पडायला नको. ह्याची काळजी आपण घेतली पाहिजे. मग संत-महात्मा होणे आपल्यालाही कठीण नाही. त्यासाठी वर्तमान जन्मात भगवान श्रीकृष्णाने सांगितलेल्या **निष्काम कर्माचे** आचरण करण्याची आवश्यकता आहे.

## मनुष्येतर योनीतील कर्मबंधन

मनुष्येतर योनी म्हणजेच वृक्ष, जलचर प्राणी, कीटक, पशु, पक्षी इत्यादी. ह्या योनी भोगप्रधान आहेत. कर्मप्रधान नाहीत. **त्यांना बुद्धी नसल्याने विचारशक्ती नाही. म्हणून त्यांचे क्रियमाण कर्म सामान्यपणे होत असते. आहार, भय, निद्रा आणि मैथुन ह्यासाठीच त्यांचे हे सामान्य कर्म. त्यात कोणताही हेतू नसतो.**

**त्यामुळे त्यांचे क्रियमाण कर्म संचितात जमा होत नाही. आपआपल्या पापकर्मांची फळे फक्त ते भोगतात.** ती कमी अधिक प्रमाणात. त्यात पुण्याचा वाटा अगदीच नगण्य असतो. बहुतेक बैल, घोडे कामालाच जुंपलेले असतात. त्यातला एखादाच बैल, नंदीबैल असतो. खाऊन पिऊन मालकाच्या मर्जीनुसार मान डोलावणे. हेच त्याचे काम. एखादाच घोडा फक्त वरातीसाठी असतो. तो टांग्याला जुंपत नाहीत. ह्यांचेच पूर्वजन्मीचे थोडे फार पुण्यअसेल. तीच गोष्ट कुत्र्यांची. बरीचशी कुत्री रस्त्यावर हिंडतात. पोटासाठी उकीरडे जवळ करतात. तरी त्यांना पोटभर अन्न मिळत नाही. फक्त हाड-हाड त्यांच्या वाटेला येते. पण काही विदेशी जातीची कुत्री मालकाच्या सोफासेटवर लोळतात. एखादे मुल-बाळ नसलेले श्रीमंत जोडपे अगदी आपल्या मुलासारखी त्यांची काळजी घेते. ह्यालाच प्रारब्ध म्हणतात.

ऋषिकेशच्या परमार्थ निकेतनमध्ये रहाणारे भगतजी महाराज. ब्रह्मचारी साधु. वर्षातून एकदा ते अंबरनाथला येतात. आवर्जून घरी येतात. त्यांच्या साध्या बोलण्यात परमार्थ भरलेला असतो. त्यांनी कर्मबंधनाबद्दल सांगितलेली एक रूपक कथा आठवली.

खेडेगावात पूर्वी तेलाचा घाणा असे. अजूनही शेंगांपासून तेल काढण्यासाठी, ती पद्धत अवलंबली जाते. घाण्याला दोन बैल जुंपलेले होते. काम फार होते. घाण्याचा मालक दिवस-रात्र बैलांना घाण्याला जुंपत असे. फक्त चार तास रात्री विश्रांती. दोघेही बैल तब्येतीने चांगले. उंचपुरे. खायला भरपूर मिळे. पण अति कामाने ते थकून जात. दोघेही त्यांच्या भाषेत बोलत असत. वेळ निघून जाई. कष्ट हलके होत. घाण्याच्या मालकाला बैलांची भाषा कळत होती. तोही त्यांचे बोलणे ऐकत असे.

एक दिवस एक बैल आपल्या मित्राला म्हणाला, मागील जन्मी मी माणसाच्या जन्मात होतो. गरीब शेतकरी होतो. हा आपला मालक माझा चांगला मित्र होता. त्याचेकडून एक हजार रुपयांचे कर्ज घेतले

होते. पण कबूल केल्याप्रमाणे दोन वर्षात, मी ते फेडू शकलो नाही. चांगल्या स्वभावामुळे त्याने कधीही माझ्या मागे तगादा लावला नाही. उलट म्हणाला, अरे मित्रा वाईट वाटून घेऊ नकोस. तुला जमेल तेव्हा दे. पण लवकरच साध्या तापाच्या निमित्ताने माझे निधन झाले. ते कर्ज फेडण्यासाठी मला बैलाचा जन्म मिळाला. आणि मालकाच्या घरी राबून, मी ते कर्ज फेडतो आहे. जवळ जवळ अर्धे कर्ज फिटले आहे. बाकीचे फिटण्यास बराच अवधी जाईल.

मालक आता लक्ष देऊन त्यांचे बोलणे ऐकू लागला. तो बैल म्हणाला, पण उरलेले कर्ज फेडण्यासाठी एक युक्ती माझ्या मनात आली आहे. आपल्या राज्याचा राजा मोठा धर्मात्मा आणि दानशूर आहे. त्याच्या राज्यात एक मोठा हत्ती आहे. नेहमी मिरवणूकीला, धार्मिक समारंभाला त्या हत्तीला सजविले जाते. राजाचा तो खूप आवडता आहे. तो सुंदर, चपळ आणि मोठा शक्तीमान आहे. पूर्वजन्मी तो पण माणसाच्या जन्मात होता. माझे त्याच्यावर खूप उपकार होते. तो मला चांगला मान देत असे. जर आपल्या मालकाने राजाला जाऊन विनंती केली आणि माझी व त्या हत्तीची झुंज ठेवली. तर आम्ही दोघे समोरासमोर आल्यावर, तो हत्ती मला ओळखेल. पूर्वजन्मीच्या उपकाराच्या ओझ्यामुळे, तो माझ्याशी झुंज न देता पळ काढेल. मग राजा आपल्या मालकाला भरपूर बक्षीस देईल. त्यामुळे लगेचच मी मालकाच्या कर्जातून मुक्त होईन. माझे ह्या जन्माचे कारण म्हणजे कर्ज. त्याचे निवारण झाल्याबरोबर मी ह्या बैलाच्या जन्मातून मुक्त होईन.

मालकाला ही गोष्ट काही पटेना. पण बक्षीसाची आशा मात्र त्याला स्वस्थ बसू देईना. दोन दिवसानंतर तो राजाकडे गेला. बैलाची आणि हत्तीची झुंज! राजा हसू लागला. मग मालक राजाला म्हणाला, राजेसाहेब एकदा ही झुंज ठरवाच. राज्यातील लोकांनापण चांगली करमणूक होईल. हत्ती जिंकला तर लोक मला हसतील. वेड्यात काढतील. पण जर का बैल जिंकला तर बैलाची वाहवा: होईल. आपल्या राज्यात असा शूर

बैल असल्याने, बाकीच्या देशातले राजे आपला गौरव करतील. आता राजाला बैलाच्या मालकाचा विचार पटला. होऊन जाऊ द्या अशी विचित्र झुंज. राज्यातल्या लोकांची करमणूक तर होईल !

मग काय ! दवंडी पिटली गेली. एक सुटीचा दिवस निवडण्यात आला. संध्याकाळी पाचची वेळ ठरविण्यात आली. दवंडी ऐकूनच लोकांची करमणूक होत होती. आठवडाभर सगळीकडे तीच चर्चा. सबंध गाव एखाद्या उत्सवासारखा उत्साहित झाला होता. झुंजीचा दिवस उजाडला. दोन दिवस आधीपासून मालकाने घाणा बंद केला. बैलाला भरपूर खाऊ घातले. त्या दिवशी बैलाला चांगले शृंगारीत केले होते. मालक मोठ्या रूबाबात बैलाला घेऊन, झुंजीच्या मैदानात आला. तिकडे राजाच्या सेवकांनीपण हत्तीला खाऊ-पिऊ घालून नटवले होते. हत्ती माजल्यासारखा झाला होता. राजदरबारातील मानकरी आणि राज्यातले प्रतिष्ठित लोक आसनावर बसले होते. राजा आपल्या परिवारासह जातीने हजर होता. संपूर्ण राज्यातल्या लोकांनी मैदानात गर्दी केली होती. सर्वांनाच अशा विचित्र झुंजीचे कुतूहल वाटत होते.

संध्याकाळचे पाच वाजले. राजाने इशारा केला. मोठ्या रूबाबात एकीकडून हत्तीची स्वारी आली. दुसरीकडून बैल मोठ्या रूबाबात पुढे आला. सर्व लोकांचे लक्ष बैलाकडेच होते. बैलाच्या नजरेत अजिबात भिती नव्हती. हत्ती व बैल दोघेही समोरासमोर आले. एवढा प्रचंड मोठा हत्ती. त्याच्या समोरचा बैल, म्हणजे अगदीच नगण्य. हत्तीने सोंड वर करत मोठ्याने गर्जना केली. आपल्या क्षुल्लक प्रतिस्पर्ध्याकडे बघितले. बैल मोठ्या रूबाबात मान वर करून हत्तीकडे पहात होता. क्षणभर दोघांची नजरानजर झाली. हत्तीने बैलाला ओळखले. पूर्वजन्मीचे त्याचे उपकार आठवले. चटकन हत्तीने मान खाली घातली. मागे वळून मैदानातून पळ काढला. सर्वांना गंमत वाटली. त्यांनी बैलाचा जयजयकार केला. राजाने बैलाच्या मालकाला भरपूर बक्षीस दिले. बैलाचे डोळे

कृतज्ञतेने पाझरू लागले. मालक बैलाला वाजत-गाजत घरी घेऊन आला. दुसऱ्या बैलाने सजविलेल्या बैलाला बघीतले. हा सुखरूप घरी आला म्हणजे ह्याने सांगितलेले खरे झालेले दिसते. त्याला आनंद झाला. मालक खुशीत होता. बैलांना वैरण आणण्यास घरात गेला. **इकडे आपल्या मित्राला भेटल्यानंतर तो बैल खाली बसला. समाधानाने आपला प्राण सोडला. तो गेल्या जन्मीच्या मालकाच्या ऋणातून मुक्त झाला होता.**

## प्रारब्धकर्म भोगावेच लागते.

जीवनात काही संकट आले की, सामान्य माणूस ज्योतिष्याकडे जातो. आपली जन्मपत्रिका दाखवतो. माणसाच्या जन्मकाळी असलेली ग्रहस्थिती, त्याच्या आयुष्यातले चढउतार सूचित करते. फक्त जन्मवेळ व स्थळ अचूक पाहिजे आणि ज्योतिषी अभ्यासू पाहिजे. तो काही उपाय सांगतो. त्याने संकटाची तीव्रता कमी होते. पण प्रारब्ध भोगावेच लागते. ते काही चुकत नाही. तसेच सद्‌गुरूंचे. आपल्या भक्तावरील संकटाची कल्पना त्यांना आधीच येते. काही प्रमाणात त्याची तीव्रता ते कमी करतात. निसर्गाच्या नियमात ते शक्यतोवर ढवळा-ढवळ करीत नाहीत. प्रारब्ध माणसाला संकटाकडे खेचून नेते. त्यावेळेस सद्‌गुरूंनी दिलेला इशारा ते विसरतात. माणसाचा मृत्यु अटळ असतो. त्याची वेळ ठरलेली असते. फक्त ती आपल्याला माहीत नसते. **जो जन्मला त्याला मृत्यु आहेच. जर माणसाचा मृत्युयोग असेल, तर प्रारब्ध त्याप्रमाणे परिस्थिती घडवून आणते. कोणाचा मृत्यु आजारपणात तर कोणाचा अपघातात. त्याचप्रमाणे घडून येते.**

याबाबत माझ्या माहितीतल्या एका सद्‌गृहस्थांचा मृत्यु मला आठवला. नागपूरचे रहाणारे सदाचारी गृहस्थ. सरकारी नोकरी. रिटायर्ड

होऊन ५/६ वर्षे झाली होती. संपूर्ण आयुष्य शांततेत आणि सत्कर्मात गेले. एक मुलगा आणि एक मुलगी. जावई मुलीसह अमेरिकेत स्थायिक झाले. तर मुलगा लग्न होऊन इंग्लंडमध्ये. दोघे नवराबायको नागपूरात आपल्या स्वत:च्या घरी रहात. सरकारी नोकरीचे चांगले पेन्शन. त्यामुळे उतारवयातपण पैशांची काळजी नाही. तब्बेतही उत्तम. मधून मधून मुलाकडे व मुलीकडे जाऊन येत. एकंदरीत सुखी कुटूंब. उतारवयातील आयुष्य सुखाने आणि भक्तिमार्गाने व्यतीत करीत होते.

तीन ते चार वर्षांपूर्वीची घटना. नागपूरहून ४० कि. मी. अंतरावरचे एक गाव. त्याठिकाणी एका नातेवाईकांकडे काही कार्यक्रमासाठी दोघेही नवराबायको बसने गेले. अगदी आरामात त्याठिकाणी पोहोचले. कार्यक्रम झाला. परिचितांच्या भेटीने ते दोघेही आनंदात होते. दुपारी चारला नागपूरला परत येण्यास निघाले. तेवढ्यात त्यांच्या लांबच्या नात्यातील जावई पुढे आले. म्हणाले, दादासाहेब थोड्या वेळाने मी माझ्या कारने नागपूरला काही कामानिमित्त जाणार आहे. मी एकटाच आहे. तुम्ही दोघेही माझ्याबरोबर कारने चला. त्या गृहस्थांची कारने जाण्याची इच्छा नव्हती. ते नको म्हणाले. पण जावयाने परत परत आग्रह केला. त्यांचा नाईलाज झाला. एक तासाने ते कारने नागपूरला जाण्यास निघाले. जावई गाडी चालवत होते. शेजारी पुढच्या सीटवर ते गृहस्थ आणि मागच्या बाजूला त्यांच्या पत्नी. बोलत बोलत प्रवास छान चालू होता. रस्तापण एकदम चांगला.

**पण प्रारब्ध हसत होते. कसे ह्यांना फसवले!** साधारण अर्धे अंतर राहिले. ओव्हरटेक करतांना समोरून एक डंपर आला. दोघांनाही स्पीडचा अंदाज आला नाही. कार जोराने डंपरवर जाऊन आदळली. प्रचंड मोठ्ठा आवाज झाला. कारचे डाव्या बाजूचे दार निखळून ते गृहस्थ जोराने बाहेर फेकले गेले. डोक्याला मार लागून जागच्या जागीच गतप्राण झाले. पुढच्या बाजूने कार चेपली गेली. त्यामुळे कार चालवणाऱ्या जावयांच्या डोक्याचा पार चेंदामेंदा झाला. ते जागीच गतप्राण झाले.

त्या गृहस्थांच्या पत्नी मात्र आश्चर्यकारकरित्या बचावल्या. त्यांना किरकोळ मार लागला. पण हे दृष्य पाहून त्यांना घेरी आली. आजही त्यांची तब्येत नॉर्मल आहे.

**प्रारब्धात, ते गृहस्थ आणि त्यांचा जावई, या दोघांचाही मृत्यु अपघाताने होणार. असेच लिहीले होते. त्यामुळे परिस्थितीत बदल झाला. बसने नागपूरला परत येण्याच्या ऐवजी, जावयाच्या आग्रहाने कारने येण्याची बुद्धी झाली.**

**प्रारब्ध मोठे विचित्र आहे.** आई-वडील, मुले, सुना, जावई, नातवंडे ही सर्व एकाच कुटुंबात कशी एकत्र येतात? जन्माला येताना प्रत्येक जण एकटाच असतो. नंतर ही जवळची नाती निर्माण होतात. **प्रारब्ध ह्या सर्वांना एकत्र आणते. ते एकमेकांच्या पाप-पुण्याची फळे भोगण्यासाठीच.** नवरा-बायकोचे स्वभाव भिन्न असतात. संस्कार भिन्न असतात. तरी परमेश्वर त्यांना एकत्र आणतो. एखादा मुलगा म्हणतो, मी वीस मुली बघितल्या. एखादा म्हणतो, मी तीस मुली बघितल्या. एखादाच असा असतो की, पहिलीच मुलगी त्याला पसंत पडते. तर त्या मुलीने पण पाहिलेला हा पहिलाच मुलगा असतो. कधी प्रेम-विवाह जमतात. तर कधी नाही. **शेवटी परमेश्वराने ठरविलेलेच स्त्री-पुरुष नवरा-बायको म्हणून एकत्र येतात.** एखादे जोडपे एकमेकांना प्रेम देत, एकमेकांच्या आवडी-निवडी जपत आनंदाने रहाते. ते दोघेही आपल्या पुण्याचे फळ एकमेकांच्या द्वारे भोगतात. बरीचशी जोडपी एकमेकांना अनुरूप असून, पैशाचे सुख असतानापण एकमेकांशी क्षुल्लक कारणाने भांडत असतात. एकमेकांना दु:ख देतात. **ह्या ठिकाणी त्यांच्या पुण्याचे फळ म्हणजे आर्थिक बाजू. पण त्याचबरोबर गत जन्मीचे पाप कर्म त्यांना भांडणाद्वारे दु:ख देते.**

मुलगा, मुलगी चांगले निघाले. खूप शिकले. आई-वडिलांशी प्रेमाने वागले. त्यांचीही लग्ने झाली. सुना, जावई चांगले मिळाले. नातवंडे

चांगली निघाली. **तर सुखच सुख. पूर्वजन्मीचे पुण्यकर्म त्यासाठी कारणीभूत असते. पण असे सहसा होत नाही.** माणसाचे थोडे तरी पापकर्म प्रारब्धाच्या रूपाने भोगायचे असते. एवढ्या सगळ्या सुखी कुटुंबात एखादा मुलगा, मुलगी वाईट निघते. मुलगा दारू पितो. शिक्षण नाही. नोकरी नाही. मुलगी दुर्वर्तनी निघते. न ऐकता भलत्याशी लग्न करते. ह्यात त्या मुला-मुलींचे पूर्वजन्मीचे पापकर्म तर असतेच. पण त्याचबरोबर आईवडिलांचे पण क्षुल्लक पापकर्म त्यांना भोगावे लागते. ते मुलांच्या वर्तनाने त्यांना दु:ख देते. मुलगा अपंग निघाला. त्याला त्या अवस्थेत जन्मभर सांभाळावे लागते. आई-बापांना किती मानसिक आणि शारीरिक कष्ट! **हे सर्व प्रारब्ध. पण त्या अपंग मुलाला सांभाळणे, हे आपल्याला परमेश्वराने दिलेले काम आहे.** असे समजून आनंदाने त्यांचा सांभाळ करणारे कितीतरी आई-बाप मी पाहिले आहेत. तुमच्या समोर पण अशी उदाहरणे असतील. **वर्तमान जन्मातील पुण्यकर्मात ह्याची गणना होते. पुढील जन्मी त्या पुण्यकर्माचे फळ त्यांना परमेश्वर नक्कीच देईल.** कर्मफळ देण्यास परमेश्वर कधीच चूक करीत नाही. आजूबाजूचे शेजारी, नातेवाईक, शाळेतील मित्र, ऑफीसमधील सहकारी ह्या सर्वांचा एकमेकांशी संबंध परमेश्वराने जोडला आहे. तो एकमेकांना आपआपल्या पाप-पुण्याचे फळ देण्यासाठीच. **प्रारब्ध भोग असे सूक्ष्म आहेत.** माणसाने विचार केला असता, ते त्याला समजून येतात.

म्हणूनच माणसाने आपले प्रारब्धभोग आनंदाने भोगावे. भक्तिमार्गाचा, सुयोग्य गृहस्थाश्रमाचा मार्ग अनुसरावा. त्याने आपले क्रियमाण कर्म चागंले होईल. पुण्यकारक होईल. **जशास तसे हा नियम आपले कर्मबंधन सैल करू इच्छिणाऱ्या माणसास योग्य नाही.** कोणाला आपण जेवावयास बोलावले. त्याचा आदर सत्कार केला. तर त्याने लगेच त्याची परतफेड केली पाहिजे. हा विचार योग्य नाही. कोणावर उपकार केले. तर लगेचच त्याने परतफेड केली पाहिजे, असे नाही.

परमेश्वर त्या कर्माचे फळ म्हणून, जेव्हा तुम्ही संकटात असाल, तेव्हा तिसऱ्या माणसाच्या रूपाने तुम्हाला मदत करेल. सामान्य माणसासाठी फळाची इच्छा न ठेवता, कर्म करणे ते हेच. अशा कितीतरी गोष्टी सांगता येतील. दुसरा वाईट वागला त्याने शिव्या दिल्या. म्हणून आपण तसे वागू नये. त्याने आपला रक्तदाब तर वाढतोच. पण आपल्या पापकर्मात त्याची भर पडते. **दुसऱ्यासाठी आपल्या मनाचे पावित्र्य, शांतता ह्यांचा ऱ्हास करू नये. गोड बोलून, मनावर न घेता सोडून देणे, हेच चांगले.**

तीर्थक्षेत्री गेल्यावर आपल्या ऐपतीप्रमाणे दानधर्म करण्याची मला सवय आहे. त्यात मला आनंद वाटतो. एकदा एक सद्‌गृहस्थ चार-पाच ठिकाणी आमच्याबरोबर होते. प्रत्येक ठिकाणी काही ना काहीतरी दान देतांना त्यांनी पाहिले. ते म्हणाले, मागच्या जन्मीचे परमेश्वराचे देणे तुम्ही आता फेडता आहात. मी बोललो काही नाही. पण मनात विचार आला. **परमेश्वराने आम्हाला केवढे दिले आहे? ते फेडणारे आम्ही कोण? आमची तेवढी ताकद तरी आहे काय?** एखाद वेळेस मागच्या जन्मीचे, त्या देवस्थानचे ऋण आम्ही फेडत असू. किंवा पुढच्या जन्मासाठी बेगमी करीत असू. असो. ह्या विषयावर लिहावे तेवढे थोडेच. **फक्त विचारपूर्वक वर्तन करणे, हेच आपल्या हातात आहे.**

## ब्रह्मातील चेतनेचा विकासवाद

**निर्गुण-निराकार ब्रह्माचे दृष्य-स्वरूप म्हणजे हे जग. ही सृष्टी.** पंचमहाभूतांपासून निर्माण झालेली. पंचमहाभूते म्हणजे आकाश, वायु, अग्नी, पाणी आणि पृथ्वी. ही सर्व पण ब्रह्मापासून उत्पन्न झालेली. म्हणून सृष्टीतील प्रत्येक वस्तूत, प्राणीमात्रात ब्रह्माचा अंश आहे. म्हणजेच चेतना

आहे. **इश्वराच्या इच्छेनुसार ह्या सृष्टीत, प्रत्येकाची उन्नती होणार आहे. त्यालाच उत्क्रांतीवाद अथवा विकासवाद असे म्हटले आहे.**

दगड, पहाड यांना जड वस्तू म्हणून संबोधले गेले आहे. त्यातही चेतना असते. पण ती अचेतन अवस्थेत आहे. त्यामुळे त्यांना स्वत:ची अशी कुठलीही गती नाही. दगडातील चेतना सुषुप्त अथवा अव्यक्त अशी आहे. हजारो वर्षानंतर त्यांचेही स्थित्यंतर होणार आहे. त्यानंतरची योनी म्हणजे वृक्ष, गवत, लहान लहान झुडपे इत्यादी. त्यांच्यातील चेतना काही प्रमाणात व्यक्त स्वरूपात आहे. बीजाचे रूपांतर वृक्षात होते. जमीनीतील पाण्याच्या रसामुळे त्याचे पोषण होऊन, वाढ होत जाते. भारतीय वनस्पतीशास्त्रज्ञ डॉ. जगदीशचंद्र बोस यांनी निरनिराळ्या वनस्पतींवर प्रयोग करून, वनस्पतीपण श्वासोश्वास करतात. असे सिद्ध केले आहे. **श्वासोच्छ्वास करणारी शक्ती म्हणजेच चेतना**. पण ती श्वासाची गती इतकी सूक्ष्म असते की, ती आपल्या बाह्य इंद्रियांना जाणवत नाही. परंतु वनस्पती ह्या काही दगडासारख्या निर्जीव नाहीत.

त्यानंतरची योनी म्हणजे सर्व जलचर प्राणी. त्यातील काही जलचर प्राणी, पाण्याच्या वर येऊन श्वासोश्वास करतांना दिसतात. तर काही प्राणी पाण्यात मिसळलेल्या वायुतील प्राणवायुचे ग्रहण करतात. ते पाण्याच्या आत राहूनच. **ह्या सर्वाला कारणीभूत असलेली जलचर प्राण्यातील शक्ती, म्हणजेच ब्रह्माचा अंश असलेली चेतना**. ह्या ठिकाणी चेतना शक्तीची गती स्पष्टपणे दिसून येते. आहार, भय आणि निद्रा यामुळे जलचरातील विकसीत शक्तीचा प्रत्यय येतो. वृक्षांपेक्षा जलचर योनी नक्कीच विकसीत आहेत. त्यानंतरची विकसीत योनी म्हणजे हवेत उडणारे पक्षी आणि पृथ्वीवर चालणारे पशू. त्यांची चलन-वलनाची गती खूपच मोठी. श्वासोश्वासामुळे त्यांचे चलन-वलन होते. चेतना शक्तीचे अगदी दृष्य असे हे स्वरूप. आहार, भय, निद्रा आणि मैथुन येथपर्यंत त्यांची प्रगती. **फक्त विचारशक्ती नाही. म्हणून भोगयोनी**. मधल्या

असंख्य किडे, मुंग्या, किटक इत्यादी योनींचा विचार केला नाही. काही प्रमाणात त्यापण भोगयोनी असतात. त्यांचे आयुष्यमान खूपच कमी असते.

**त्याच्या पुढील उत्क्रांती म्हणजे परमेश्वराने निर्माण केलेले, माणसाचे विकसीत शरीर.** आहार, निद्रा, भय आणि मैथुनाबरोबर परमेश्वराने दिलेली, बुद्धीची देणगी. त्यामुळे निर्माण झालेले विचारशील मन. **भोगयोनी बरोबरच कर्मयोनीची परमेश्वराकडून मिळालेली देणगी. सृष्टीतील प्रत्येक जीव उन्नतीकडे जात असतो.** म्हणजेच पुढील जन्मात त्याला अधिक विकसीत योनीचा लाभ होतो. त्यासाठी लागणारा काळ मात्र निश्चित नसतो. प्रत्येक जीवासाठी लागणारा काळ, वेगळा असू शकतो. त्याचे नियंत्रण परमेश्वराच्या हातात असते. **चौऱ्यांशी लक्ष योनीतील प्रवासानंतर, परमेश्वराच्या कृपेनेच जीवाला मनुष्ययोनीचा लाभ होतो. तो प्रारब्ध भोगाबरोबरच कर्मयोगाने आपली उन्नती करून घेण्यासाठीच.** मनुष्यजन्म मिळणे किती कठीण आहे! ते आपणास समजून येते. भौतिकशास्त्रज्ञ डार्विनने सृष्टीतील उत्क्रांतवाद मांडला आहे. पण त्याने सुरूवात जलचर प्राण्यापासून केली आहे. भारतीय तत्त्वज्ञानी ऋषींनी मांडलेला उत्क्रांतवाद त्यापेक्षा पुरातन आहे. त्यांनी सुरूवात त्या आधीच्या दगड, पहाड इ. जडवस्तूंपासून केली आहे.

म्हणूनच जीव म्हणजे जीवात्मा. परमात्म्याचा अंश. उन्नत होत होत, ह्या सर्व योनीतून प्रवास करीत करीत, दुर्लभ अशा मानव योनीपर्यंत येऊन पोहोचतो. **विचारामुळे कर्म करीत त्याला नराचा नारायण होणे शक्य होते.** त्यासाठी ह्याच जन्मात आपण प्रयत्न करायला काय हरकत आहे? सुरुवात तर करावी. पुढे किती जन्म लागतील! तो सृष्टीच्या नियंता परमेश्वर, ते बघून घेईल. आपण चिंता कशाला करायची? निर्मळ मन, चांगली वागणूक, सत्कर्म आणि भगवंताचे भक्तियुक्त नामस्मरण, हाच परिपूर्ण परमार्थाचा पाया आहे.

# पुनर्जन्माचे आकर्षण

**पुर्नजन्माचे आकर्षण प्रत्येकालाच आहे. आस्तिक माणसाला तर आहेच. पण नास्तिक माणसालाही मनातून त्याबद्दल जाणून घ्यावेसे वाटते.** पुनर्जन्माबद्दलचे लिखाण त्याच्या पहाण्यात आले तर, ते तो आवर्जुन वाचतो. जगात सर्वत्र हीच भावना दिसून येते. इंग्लंडमध्ये इ. स. १८८२ साली 'परामनोवैज्ञानिक समिती'ची स्थापना झाली. ती पुनर्जन्माच्या संशोधनासाठी. अमेरिकेतपण त्याची शाखा आहे. इतर अनेक ठिकाणी आहेत. पुनर्जन्माआधीचे आणि मृत्युच्या नंतरचे पारलौकिक जीवन काय असते? ह्याबद्दलचे कुतूहल पाश्चात्य शास्त्रज्ञांनापण स्वस्थ बसू देईना. पुनर्जन्माचे काही पुरावे त्यांना मिळाले आहेत. आकस्मित मृत्युनंतर पुढील जन्मात काही जीवात्म्यांना पूर्वजन्मीचे स्मरण असते. ते लहान वयात तीव्र असते. त्यांच्या मुलाखती शास्त्रज्ञांनी घेतल्या. त्यापैकी बऱ्याच लहान मुलांनी आपले पूर्वजन्मीचे नाव, गाव, व्यवसाय यांची अचूक माहिती दिली. तसेच त्या गावात नेल्यानंतर आपले पूर्वजन्मीचे घर दाखवले. घरात गेल्यावर आपल्या पूर्वजन्मीच्या पत्नीला व मुलांना ओळखले. त्यांची नावे सांगितली. काही गुपीत गोष्टींचा उल्लेख केला. तो अगदी बरोबर निघाला. एकाने तर आपण पुरून ठेवलेल्या गुप्त धनाची जागा दाखविली. तेथे खणले असता, खरोखरच धनाची प्राप्ती झाली. पूर्वजन्माची स्मृती असलेली ती मुले, वर्तमान जन्मात रस घेऊ शकली नाहीत. **ह्या सर्व पुराव्यांवरून शास्त्रज्ञांनी पुनर्जन्माचा सिद्धांत मान्य केला. पण ते ह्यापुढे फारशी प्रगती करू शकले नाहीत. कारण हा सर्व सूक्ष्म सृष्टीचा प्रांत. त्याला प्रगत ध्यानाची आवश्यकता असते.**

अतिशय प्रगत असे ध्यान आणि त्यानंतरची समाधी अवस्था.

ह्याद्वारे आपले पूर्वीचे ऋषिमुनी सूक्ष्म देहाद्वारे स्वर्ग, नरक, वैकुंठ, पितृलोक, नागलोक, पाताळलोक इत्यादी अनेक लोकांचा प्रवास करू शकत. त्या प्रवासाद्वारे त्यांनी सर्व लोकांचा अभ्यास केला. त्यांची वर्णने, हेतू, कार्य ह्यासंबंधी लिहून ठेवले. वेद-उपनिषदात हे सर्व सांगितले आहे. पुनजर्न्माचा सिद्धांत हा कर्माच्या सिद्धांताशी निगडीत आहे. शेवटी काही पाश्चात्य तत्त्वज्ञांनी वैदिक धर्मातील तत्वे मान्य केली. **आजही हिमालयात व इतर ठिकाणी बोटावर मोजण्याइतके महात्मे आहेत. ते सूक्ष्म देहाने आकाशमार्गाने भ्रमण करू शकतात. मृत्युनंतरच्या परलोकात प्रवेश करू शकतात.**

ख्रिश्चन, मुस्लीम, तिबेटीयन इत्यादी धर्मांच्या प्राचीन ग्रंथात मृत्युनंतरच्या जीवनाचे वर्णन आहे. वैदिकधर्मातल्या वर्णनाशी ते थोडेफार मिळते जुळते आहे. आपल्या गरूड पुराणात त्यासंबंधी विस्तृत वर्णन केलेले आहे. परंतु आधुनिक भौतिक शास्त्रज्ञ पुनर्जन्माला मान्यता देत नाहीत. त्यांच्या मते जन्म म्हणजे, काही भौतिक आणि रासायनिक पदार्थांचे संगठण. आणि मानवाचा मृत्यु म्हणजे, त्या पदार्थांचे विघटण. एवढेच ते जाणतात. पूर्वजन्म नाही. पुनर्जन्म नाही. कर्माचा सिद्दांत म्हणजेच कर्मबंधन, त्यांच्या खिजगणतीतही नाही. फक्त वर्तमान जन्म खरा. त्यात मजा करा. देहभोगासाठी अमर्यादित अशा वासनांची पूर्ती म्हणजेच मजा. त्यासाठी हिंदू धर्मातील लोक कल्पनाही करू शकणार नाहीत. असे वासनापूर्तीचे मार्ग त्यांनी शोधून काढले आहेत. त्यात सेक्सला प्राधान्य आहे. कर्मबंधनाची भीती नाही. म्हणून निती, अनिती, पाप,-पुण्य यांची चाड नाही. पालक-पाल्य, पती-पत्नी, गुरू-शिष्य, मित्र-बांधव ह्या नात्यातील पावित्र्य नष्ट झाले आहे. प्रेमाची-आपुलकीची, कर्तव्याची भावना नष्ट झाली आहे. **पैसा हाच देव. त्याच्यासाठी ते काहीही करायला तयार आहेत.** त्यामुळे आधुनिक म्हणवणारा माणूस मन:शांती गमावून बसला आहे. कर्मबंधनाचा विचार केला तर, अशा लोकांची गती काय असेल? ह्याचा विचारही करवत

नाही. भारतातला आधुनिक मानवपण त्याच चुकीच्या मार्गाने जात आहे.

**काही पाश्चिमात्य लोक भोगवादाला कंटाळून मन:शांतीसाठी भारतातील साधु-संतांच्या आश्रयाला आलेले दिसतात. पैशाची चिंता नसते. ते आध्यात्मिक मार्गाने आपले जीवन व्यतीत करतांना दिसतात. नक्कीच त्यांची उन्नती होत असेल. आपण मात्र त्या भोग-संस्कृतीच्या आकर्षणाने आपलेच तत्त्वज्ञान विसरलो आहोत.** हे कुठेतरी थांबले पाहिजे. कदाचित काही लोकांचे प्रारब्ध, त्यांना तसे करण्यास प्रवृत्त करीत असेल. **आपले बर्हीमन दूषित झाले तरी, अंतरमन शुद्धच असते. काही चांगले अथवा वाईट कृत्य करण्याचे अगोदर आपल्या अंतरमनाचा कौल घ्यावा. ते अंतरमन योग्य तोच सल्ला देईल. पण आपण मात्र त्याचे ऐकले पाहिजे ना!**

पुर्नजन्माबद्दल एक गोष्ट आठवली. एका खेडेगावात एक शेतकरी होता. त्याचे वडील प्रथमपासूनच खूप रागीट होते. तो शेतकरी तरूण झाला. वडील त्याचे कडून लहानपणापासूनच खूप काम करून घ्यायचे. वर रागाने शिव्यापण द्यायचे. मुलगा शांत स्वभावाचा. वडील कधी कधी मारहाणपण करायचे. पण वडिलांचा मान राखून तो सर्व सहन करायचा. एक दिवस त्या शेतकऱ्याच्या वडिलांचा अकस्मात मृत्यु झाला. वडिलांच्या जाचातून त्याची सुटका झाली. तरी त्याच्या स्वभावानुसार त्याला दु:ख झालेच. वर्ष भरातच त्याच्या गोठ्यातील एका गाईला वासरू झाले. तो गोऱ्हा होता. जसजसा मोठा होत गेला, तसतसा वांडपणा करू लागला. खायला भरपूर लागायचे. काममात्र काहीच करेना. शेतकऱ्याने त्याला वेळोवेळी गोंजारून पाहिले. पण फरक काहीच नाही. शेवटी शेतकरी वैतागला. त्याला वठणीवर आणण्यासाठी रोज मोठ्या जाड काठीने मारहाण करू लागला. शांत शेतकऱ्याचा स्वभावपण त्यामुळे रागीट झाला.

एक दिवस शेतकऱ्याची बैलाला मारहाण चालू होती. दारावरून एक साधु चालला होता. चांगला ज्ञानी होता. चटकन त्याच्या लक्षात

सर्व प्रकार आला. तो शेतकऱ्याच्या घरात आला. शेतकऱ्याने बैलाला मारायचे थांबवले. साधुला मोठ्या आदराने बसवले. गूळ-पाणी दिले. जेवायला थांबा म्हणाला. शेतकरी मुळातच स्वभावाने चांगला होता. पण वैतागाने हे सर्व चालले होते. साधुने शेतकऱ्याला आपल्या शेजारी बसवले. शांतपणे म्हणाला, तू ज्या बैलाला रोज मारहाण करतोस. ते पूर्वजन्मी तुझे वडील होते. रागाने ते तुला राबवून घेत आणि मारहाण करीत. त्या कर्माचे फळ भोगण्यासाठी त्यांनी बैलाचा जन्म घेतला आहे आणि रोज तुझ्या हातचा मार खात आहेत. हे ऐकताच शेतकरी रडू लागला. त्याला खूप वाईट वाटले. न कळत आपण काय करीत होतो. त्याने साधुचे पाय धरले. लगेचच बैलाच्या जन्मात असलेल्या वडिलांच्या गळ्याला मिठी मारली. रडू लागला. त्या बैलाच्या डोळ्यात पण अश्रू आले. वडील-मुलाची भेट झाली. पाच मिनिटातच त्या बैलाने ह्या जगाचा निरोप घेतला. **मुलाला मागील जन्मात मारहाण करण्याच्या कर्माचे फळ, त्यांनी बैलाच्या जन्मात मुलाकडूनच मार खाऊन भोगले होते. ते संपता क्षणीच बैलाच्या जन्मातून ते मुक्त झाले.** त्या साधुलापण समोरची घटना पाहून गहिवरून आले. शेतकऱ्याने घराच्या आवारातच त्या बैलाचे दफन केले. त्याची समाधी बांधली. पुढे रोज सकाळी त्या समाधीला नमस्कार करूनच, तो कामाला सुरवात करायचा. असा मुलगा आई-वडिलांना लाभला तर?

## अत्यंत विपरीत असे कलियुग

गरूड पुराणातील पंधराव्या अध्यायात मधुसूदन म्हणजेच भगवान विष्णु गरूडाला सांगतात. चारही युगात सत्ययुग, त्रेतायुग आणि द्वापारयुग ही फार उत्तम होती. मनुष्यप्राणी स्वधर्माचरण करून अत्यंत प्रेमाने रहात. यज्ञ-याग करीत. आपल्या शुद्ध अंत:करणाने आणि आचरणाने

भगवत्‌भक्ती करीत. मला प्रसन्न करून घेत आणि मुक्ती मिळवीत. निसर्ग आणि निसर्गातील प्राणी, यांची पण त्यांना उत्तम रितीने साथ मिळे. तरीपण त्या काळातही तामसी गुणाच्या प्रादुर्भावाने बरेचशे राक्षस उत्पन्न होत. तपाचरण करून देवांकडून वर प्राप्त करून घेत. नंतर त्याचा दुरूपयोग करून ऋषी-मुनी, भगवत्‌भक्त, विद्वान ब्राह्मण व इतर सामान्यजन यांना पीडा देत. त्यांना स्वधर्माचे आचरण करण्यापासून वंचित करीत. त्यासाठी मी मत्स, कुर्म, वराह, नरसिंह, वामन इत्यादी दहा अवतार घेतले. राक्षसांना युक्तीने व शक्तीने मारून अधर्माचा नाश केला. धर्माचे रक्षण केले. पुढे येणारे चौथे युग, कलियुग मात्र भयंकर कठीण असेल. **परंतु ह्या कलियुगात मात्र मी अवतार धारण करणार नाही. माझे अंशभूत असलेले देव व साधु-संत यांचे द्वारा मी धर्मरक्षणाचे कार्य करिन.**

अत्यंत धूर्त असा कलि, हळूहळू सर्व सात्विक जनांचा ताबा घेईल. सर्व वर्णांचे लोक आपला स्वधर्म विसरतील. पापमार्गाने धन मिळवतील. त्यात त्यांना काहीच गैर वाटणार नाही. **पैसा हाच देव होईल. पैश्यासाठी कुठलाही नीचमार्ग अवलंबण्यास मुनष्यप्राणी कचरणार नाही.** ब्राह्मण आपला धर्म सोडून नीचमार्गाचा अवलंब करतील. पुत्र आपल्या माता-पित्यांचा द्वेष करेल. गुरू, माता-पिता, स्त्री आणि शरणागत नर यांचे रक्षण करून, धर्माचे पालन करणारा पुरुष क्वचितच दिसेल. **धन आणि स्त्रीच्या लोभाने मानवांची मने दूषित होतील. यामुळे ते सर्व आचार-विचार विसरतील. निंदय कर्म करण्यास प्रवृत्त होतील. माझ्या निरपेक्ष भक्तीपेक्षा बेगड्या भक्तीचाच दंभ माजविला जाईल. त्यातून भोंदू साधुंचा सुकाळ होईल. धनप्राप्ती हाच त्यांचा हेतू असेल. स्त्रीया पतीला तोषविणार नाहीत. भ्रतार स्वस्त्रीपेक्षा परस्त्रीचाच अधिक विचार करील. त्यामुळे वर्णसंकर होऊन मानव जातीची हानी होईल. नरदेहाचा मूळ हेतू म्हणजेच परमेश्वर प्राप्ती. त्याची कोणाला आठवणही**

**होणार नाही.** कलियुगात मनुष्याचे शरीर लघु होईल. आणि आहार मात्र वाढेल. सर्व वर्णांचे आचरण शूद्रा प्रमाणे होईल. धष्ट पुष्ट गाई शेळीच्या आकाराच्या होतील. सर्व धान्यांचा आकार अणुप्रमाणे होईल. त्यातला पौष्टिकपणा निघून जाईल. महावृक्ष ठेंगणे होतील. आकाशातील विजांचे प्रमाण वाढेल. सर्वलोक लोभासाठी तीर्थयात्रा करतील. लोभासाठी शिवाला भजतील. विष्णूचे पूजन करतील. लोभासाठी गणेशपूजा, दुर्गापूजा यांचे मोठमोठे उत्सव करतील. गुरू विद्यादान देतांना प्रथम स्वत:च्या लोभाचा विचार करील. **पंडित, विद्वान लोक मोठ मोठी भगवतभक्तीयुक्त प्रवचने-कीर्तने करतील. पण स्वत: मात्र तसे वर्तन करणार नाहीत. लोभापासून ते पण मुक्त रहाणार नाहीत.**

**असा हा कलिप्रभाव सर्वत्र वाढलेला असतांनापण, गरूडा माझ्या इच्छेनुसार दयाळू, स्वधर्माचे आचरण करणारे ब्राह्मण, साधु-संत, महात्मे या भूतलावर जन्म घेतील. माझाच अंश त्यांच्यामध्ये असेल. ते ह्या कलियुगातील पापी जनांना तसेच सज्जनांना धर्माचरणाचे महत्त्व पटवून देतील. माझ्या नामस्मरणाचा बोध करतील. त्या मार्गाचा अवलंब करून काही मनुष्यप्राणी सद्गतीपण प्राप्त करतील. मोक्षाची प्राप्ती करून घेऊन चौऱ्यांशी लक्ष योनीतील दुर्धर प्रवासाच्या चक्रातून मुक्त होतील.** कलियुगात यज्ञयागाचे फारसे महत्त्व राहणार नाही. **फक्त स्वधर्माचरण आणि माझे भक्तियुक्त भावाने नामस्मरण हेच मनुष्याला भवसागरातून तारून नेईल.**

भगवान विष्णुंनी कलियुग सुरू होण्याच्या आधी केलेले, कलियुगाचे तंतोतंत वर्णन आजही किती लागू पडते! अशा आजूबाजूच्या खडतर वातावरणातून अलिप्त राहून, भगवंताने सांगितलेल्या भक्तिमार्गाचा अवलंब करण्यास काय हरकत आहे?

# गरूड पुराण

फार पूर्वीच्या काळी गरूडाने विष्णुला विचारले. तुमच्या कृपेने सर्व लोकात मला अव्याहतगती आहे. म्हणजे सर्व लोकात मी विनासायास जाऊ शकतो. आतापर्यंत मी अनेकदा सर्व लोकात विहार केला. स्वर्गलोकात पुण्यवान मनुष्य कसे सुख भोगतो? पाताळलोकातील राक्षसांचा विहार, नागलोकातील नागांचा आचार बघितला. वैकुंठलोकात तर आपला नेहमीच निवास असतो. तुमच्या रूपात एकरूप झालेले साधू-संत मी बघितले. पितृलोकातील पवित्र आत्म्यांचा निवास, सिद्धलोकातील आत्मस्वरूपात तल्लीन झालेले सिद्ध पुरुष हे सगळे मला ज्ञात आहे. पृथ्वीलोकातील चौऱ्यांशी लक्ष योनी आणि तुमचा आवडता मनुष्यप्राणी. त्याची जगण्याची धडपड. काही मनुष्यांची अद्भुत अशी, आपल्या ठिकाणची भक्ती. हे सगळे मी जाणतो.

**परंतु याम्यपुरी म्हणजे धर्मराज यमाची यमनगरी. त्या यमपुरीची रचना माझ्या नयनांना दिसत नाही. मी तेथे जाऊ शकत नाही. याम्यपुरात पापी जनांना दंड दिला जातो. असे मी ऐकले आहे. भूलोकावर भरतखंड विख्यात आहे.** तो क्षार समुद्राने तिन्ही बाजूंनी वेष्टित आहे. तेथे पुण्यवान नर आणि नारी आपल्या कर्माची दोरी धरून, पुढे-मागे जन्म घेतात. तरीपण अज्ञानामुळे हे भगवान विष्णु ते तुझी एकनिष्ठपणे भक्ती करीत नाहीत. उलट आपल्या कर्मबंधनाची आठवण नसल्याने त्यांचा कल पापकर्माकडे असतो. त्यातच त्यांना आनंद होतो. विषयसुखाने आंधळे होऊन, ते निचकर्मे करतात. त्यांचे आयुष्य सरल्यानंतर, त्यांना कोणता लोक मिळतो? मी असे ऐकले आहे की, यमदूत त्यांना यमपुरीत नेऊन खूप पिडतात. ज्यामुळे त्यांच्या सूक्ष्म देहाला अत्यंत वेदना होतात. ते सर्व प्रारंभापासून शेवटपर्यंतचे वर्णन करून, मला नीट समजावून सांग. तसेच मनुष्यप्राणी मेल्यावर,

त्याच्या स्वजनांनी काय क्रिया कराव्या? ज्यायोगे त्या मृतात्म्याला शांती मिळून, त्याचा परलोकाचा प्रवास सुखाचा होईल. **'तेच हे गरूडपुराण.' भगवान विष्णुंनी स्वमुखाने गरूडाला निवेदन केलेले. त्याचा हेतू मानवाचे कल्याण हाच आहे.**

'गरूडपुराण' हे सहसा मनुष्याच्या मृत्युनंतर, त्याचे नातेवाईक दहा दिवसात वाचतात. त्यातील कर्मबंधनाचे ज्ञान त्या मृत व्यक्तीच्या आत्म्याला काहीच उपयोगाचे नसते. शेतातील धान्य पक्ष्यांनी खाल्यानंतर, शेताचे रक्षण करण्यासारखे ते आहे. **भगवान विष्णुंनी स्वमुखाने जे कर्मबंधन समजावून सांगितले. त्याचे मनन जिवंतपणीच माणसाने केले, तर त्याला परलोकातील जीवन सुसह्य करता येईल. 'कर्माची गती अति गहन आहे.'** त्यासाठी गरूडपुराणातील श्राद्धकर्मांचा भाग सोडून, कर्मगतीचा विचार आपण करू. त्याचे मनन केले असता, जीवन जगण्याची कला आपणास आत्मसात करता येईल.

## शास्त्राप्रमाणे आचरणाचे महत्त्व

गरूडपुराणात भगवान विष्णु म्हणतात. भरतखंडातले भागीरथी तीर मला अत्यंत प्रिय आहे. ते माझेच स्वरूप आहे. मनुष्याने भागीरथी तीरावर केलेली भगवत्‌भक्ती लवकर फळास येते. तसेच भागीरथी तीरावर मनुष्याने घेतलेल्या प्रायश्चिताने मी त्याचे कर्मफळ कमी करतो.

**जे शास्त्राप्रमाणे मनापासून आचरण करतात आणि भगवंताची प्रेमपूर्वक निष्फळ भक्ती करतात. त्यांना मेल्यानंतर कधीही दुर्गती मिळत नाही. म्हणजेच त्यांना दु:ख भोगावे लागत नाही. त्याउलट जे शास्त्रमार्ग टाकून, पापाचरणाचे आचरण करतात. त्यांना निश्चित दुर्गती आहे.** त्यांना नरकात जाऊन,

नरकयातना भोगाव्या लागतात. त्यानंतर ते परत जन्म घेतात. त्या जन्मात त्यांच्या पूर्वपापांची चिन्हे उमटलेली असतात. पुढील उत्क्रांतीसाठी तो मनुष्यजन्म पण असू शकतो. ज्याने पूर्वजन्मी ब्राह्मणाची हत्या केली आहे. त्याला पुढील जन्मी क्षयरोग होतो. जो सोने चोरतो. पुढील जन्मी त्याची नखे कुजतात. जो गुरूपत्नी अथवा परस्त्री गमन करतो. तो पुढील जन्मी निश्चितच दुष्कर्मे करतो. त्याची मतीच तशी होते.

गृहस्थाने काही प्रमाणात आपली संपत्ती धर्मार्थ कार्यात खर्च करावी. साधु-संतांचा संग करावा. सर्व मानवांनी स्वधर्माचरण करावे. स्वार्थासाठी परधर्माचे अनुकरण करू नये. **अग्नीने शरीर जाळले. तरी आत्मा जळत नाही. शरीर मृत झाल्यावर तो बाहेर पडतो. आपल्याबरोबर पाप-पुण्याचे गाठोडे, पुढील जन्मासाठी घेऊन जातो.** पापी लोकांना नरकप्राप्ती होते. तर पुण्यवान लोकांना स्वर्ग मिळतो. मृत दिवसापासून **स्वधर्मात सांगितलेले सर्व विधी अवश्य करावेत. ते आपआपल्या ऐपतीप्रमाणे.** त्यातल्या अतिखर्चिक अशा, न परवडणाऱ्या रूढी-परंपरांना फाटा दिला तरी चालेल. **शास्त्रोक्त पिंडदान-तर्पण आदि भाग महत्त्वाचा.** गांवजेवणाचा भाग अजिबात महत्त्वाचा नाही. काही जाती-जमातीत दारू दिल्याशिवाय प्रेतपण उचलले जात नाही. अशा अनिष्ट प्रथा, रूढी-परंपरेतून पुढे आलेल्या आहेत. त्याला शास्त्राधार नाही.

रज-तम-सत्व ह्या त्रिगुणांनी सृष्टीची निर्मिती झाली आहे. माणसातपण हे त्रिगुण असतातच. गरूडपुराणाप्रमाणे राजस लोकांना (रजोगुणाने युक्त असणारे) भूलोक प्राप्त होतो. तामस लोक (तमोगुणाने युक्त असणारे) नरकस्थानी जातात. तर सात्विक लोकांना (सत्व गुणाने युक्त असणारे) स्वर्गाची प्राप्ती होते. याला भगवत्‌गीतापण प्रमाण आहे. पती-पत्नींनी एकमेकांशी प्रतारणा केली तर, त्यांना निश्चितच नरकलोक प्राप्त होतो. **काम, क्रोध आणि लोभ हे माणसाचे आंतरमल आहेत.**

**सुज्ञजनांनी कामाला धैर्याने जिंकावे. शांतीने क्रोध कमी करावा. आणि संतोषाने लोभाचा नाश करावा.**

ज्यांनी पूर्वजन्मात अजिबात दान केले नाही. त्यांना ह्या जन्मी अत्यंत दारिद्रय भोगावे लागते. ते दीनवाणे होऊन अन्नाची भिक्षा मागतात. त्यामुळे माणसाने नेहमी यथाशक्ती दान करावे. सतपात्री केलेले दान वाया जात नाही. **मनुष्य जन्मात अर्थ(पैसा) आणि काम (स्त्रीभोग) ही दोन्ही अनर्थाचे कारण आहे.** योग्यमार्गाने मिळवलेला पैसा आणि त्यातून काही प्रमाणात केलेला दानधर्म. पुरुषांसाठी एकपत्नीव्रत. तसेच स्त्रियांसाठी पतीव्रताधर्म. हेच स्त्री-पुरुषांना सात्विक बनवतात. आणि भवसागरातून तारून नेतात. असे भगवंतांनी गरूडाला सांगितले.

पुढे भगवंत सांगतात. सर्व चौऱ्यांशी लक्ष योनीतील प्राणी आहार, मैथुन, निद्रा, भय आणि क्रोध यांनी व्यापलेले आहेत. मनुष्यप्राण्याला हे सर्व आहेच. पण मन आणि बुद्धी यांच्या लाभामुळे, त्याला ह्या सगळ्यांवर नियंत्रण ठेवता येते. मनुष्यजन्मात तृष्णा फार वाईट आहे. **द्रव्यसंग्रहाची तृष्णा कधीच मिटत नाही.** शंभर मिळाल्यावर सहस्राची इच्छा होते. सहस्र मिळाल्यावर लक्षाची इच्छा. लक्ष मिळाल्यावर करोडोची. आणि त्यानंतर राज्य प्राप्तीची इच्छा होते. त्यामुळे आजकाल अति श्रीमंत माणसे, अजून जास्त पैसा मिळवण्यासाठी राजकारणात शिरतात. नगरसेवक आमदार होतात. आमदार मंत्री होतात. अमाप राज्यसत्ता भोगतात. त्यातून अमाप संपत्तीची प्राप्ती. ही तृष्णा कधीच मिटत नाही. पुढे मुख्यमंत्री, पंतप्रधान. त्यानंतर ती तृष्णा आपल्या मुलाला मंत्री बनवते. पूर्वीच्या काळी राजा. मग चक्रवर्ती राजा. मग देव. नंतर इंद्रपद अशी ती तृष्णेची साखळी होती. अशी तृष्णा( आशा) पापमती असते. तिच्या पूर्ततेत माणूस विरक्ती विसरतो. आणि नरकाचा धनी होतो. **पण वैराग्यपूर्ण पुरुष तृष्णेपासून लांब राहून स्वर्गसुख मिळवतो.**

# मृत व्यक्तीच्या अग्नीसंस्कारानंतर जीवाची दशा

मृत व्यक्तीच्या देहातून जीव बाहेर पडल्यावर, त्याचे रूपांतर प्रेतात्म्यात होते. प्रेतात्मा हा वायुरूप असतो. त्यामुळे तो वायुरूपाने भ्रमण करू शकतो. साधारण माणसाला तो दिसत नाही. पण सूक्ष्म देहाचे ज्ञान असणारे महात्मा, त्याला पाहू शकतात. त्याच्याशी बोलू शकतात. तो प्रेतात्मा मृत देहाच्या आजूबाजूलाच घोटाळत असतो. म्हणून लवकरात लवकर मृत देहाचे अग्नीसंस्कार करणे महत्त्वाचे आहे. हिंदू धर्मात अग्नीसंस्कार करतात. इतर अनेक धर्मात मृत देहाचे दफन करतात. पारश्यांच्या एका जमातीत, मृत देहाला विवक्षित विहिरीत सोडतात. त्यात गिधाडे त्या मृत देहाचे लचके तोडून, त्याचे भक्षण करतात. ह्याबाबतीत पण **प्रत्येकाने आपल्या स्वधर्माप्रमाणेच मृत देहाचे संस्कार करावेत. असे भगवान विष्णु गरूडाला सांगतात.**

आपला देह अग्नीमुखी पडल्याचे पाहून प्रेतात्मा खूप दुःखी होतो. ज्या देहावर इतकी वर्षे प्रेम केले, तो देह नष्ट होतांना त्याला यातना होतात. अग्नीचा दाहपण त्याला जाणवतो. तो दाह शीतल होण्यासाठी चितेच्या जागेवर  पयसिंचन म्हणजे दुधाचा सडा टाकण्यास सांगितले आहे. प्रेतावर अग्नीसंस्कार झाल्यानंतर यमदूत त्या प्रेतात्म्याला शिघ्रगतीने यमलोकात घेऊन जातात. यमराजांची परवानगी घेऊन परत त्याला भूलोकात घेऊन येतात. तेरा दिवसपर्यंत त्याला घराच्या आसपास ठेवतात. मात्र आत्मज्ञानी संत-महात्म्यांचा आत्मा मृत्युनंतर ताबडतोब परमात्म तत्वात विलीन होतो. दहा दिवसापर्यंत व्यक्ती मृत झालेल्या जागेवर, अखंड तेलाचा दिवा लावण्याची प्रथा आहे. **आपण मृत देहातून बाहेर पडलो आहोत. आपले जीवन आता वेगळे झाले आहे. हे त्याला खरेच वाटत नाही. त्यात रूदन करणारे आपले**

**आप्तजन पाहून त्याला अजूनच यातना होतात. म्हणून आप्तजनांनी रडत न बसता, मृत व्यक्तीचा परलोक प्रवास सुखकर व्हावा म्हणून नामस्मरण करावे, गरूडपुराण वाचावे. असे शास्त्र सांगते.**

प्रेतात्म्यांसाठी अग्नीसंस्कारानंतर रोज दहा दिवसपर्यंते श्राद्ध करण्याचा प्रघात पूर्वी होता. त्यामुळे रोज प्रेतात्म्याला भोजन मिळत असे. पण आजकाल दहाव्या दिवशी प्रत्येक दिवसाचा एक पिंड ठेवून, ही श्राद्धे करण्याचा प्रघात आहे. **वायुरूप प्रेतात्मा अन्न ग्रहण करू शकत नाही. पण त्याच्या वासानेच त्याची तृप्ती होते.** बऱ्याच ठिकाणी दिव्यासमोर रोज नैवेद्य दाखविण्याची पद्धत आहे. त्याचा हेतू तोच असावा. तेराव्या दिवसापर्यंतचे श्राद्धविधी शास्त्राप्रमाणे पूर्ण झाल्यानंतर, प्रेतात्मा खऱ्या अर्थाने यमपुरीच्या प्रवासास निघतो. तेराव्या दिवसाच्या सपिंडी श्राद्धानंतर प्रेतात्म्याला पितर ही संज्ञा प्राप्त होते. परंतु पुढील प्रवासात आपण त्याचा उल्लेख प्रेतात्मा म्हणूनच करू. ते सर्व श्राद्धविधी गुरूडपुराणात सांगितले आहेत. पण त्याचा परामर्श घेण्याचा आपला हेतू नाही. **फक्त प्रेतात्म्याच्या क्लेशदायक प्रवासाची आपणास माहिती असावी, हा हेतू. आपल्या वर्तमान जन्मातील कर्मांप्रमाणे तो परलोकाचा प्रवास कमीअधिक सुखकर किंवा क्लेशदायक होतो.**

## वर्षभराच्या वासनादेहाचा यमपुरीचा प्रवास (प्रथम सहा महिने)

तेराव्या दिवसाच्या सपिंड श्राद्धानंतर प्रेताचे पिंडदेहात रूपांतर होते. असे मधुसूदन गरूडाला सांगतात. त्याला प्रेतात्मा म्हटले जाते. तेराव्या दिवसानंतर प्रेतात्मा महामार्गाने परलोकातील प्रवासास म्हणजे यमपुरीच्या प्रवासास निघतो. **प्रेतात्मा वायूरूप असला तरी, खडतर यमपुरीच्या मार्गातले अडथळे त्याला क्लेश देतात. त्याची गती मानवाच्या**

**गतीपेक्षा कितीतरी अधिक असते. 'भूलोकापासून यमपुरीचे अंतर शहाऐंशी हजार तीनशे योजनेच्यावर सांगितले आहे.'** तो प्रेतात्मा रात्रंदिवस तहान-भुकेने व्याकूळ होऊन महामार्गाने प्रवास करीत असतो. दर दिवशी त्याला **दोनशे सत्तेचाळीस योजने** ह्या अंतराचा प्रवास करावा लागतो. ह्या महामार्गात तलवारीच्या धारेसारखी पाने असणारी वने असतात. प्रेतात्मा यमपाशाने बद्ध असतो. ती टोकदार झाडांची पाने टोचल्यामुळे त्याला अत्यंत वेदना होतात. त्यातच तो तहान-भुकेने व्याकूळ झालेला. यमदूत फरपटत त्याला नेत असतात. त्या वेदनांची आपणास कल्पनाही करवत नाही.

संपूर्ण वर्षात सोळा ठिकाणी प्रेतात्म्यासाठी विश्रांतीची ठिकाणे असतात. तेथे यमदूत त्याला सावकाश बसवतात. **तेथे प्रतिश्राद्धाचे अन्न आणि पाणी भक्षण करण्यास देतात. त्याने प्रेतात्म्याला थोडे समाधान मिळते. म्हणून बारा मासिक श्राद्धे करण्याचे शास्त्र आहे.** पूर्वी प्रत्येक महिन्याला, त्याच तिथीला एक श्राद्ध करीत. पण सध्याचे परिस्थितीत ते शक्य नसल्याने, बाराव्या दिवशी बारा मासिक श्राद्धे करून घेतात.

**भूलोकापासून यमपुरीपर्यंतच्या महामार्गात सोळा पुरे म्हणजेच नगरे लागतात.** त्यांची नावे आणि वर्णन गरूडपुराणात दिले आहे. पहिले याम्यपूर. तेथे पुष्पभद्रा नदी ओलांडून प्रेतात्म्याला जावे लागते. यमदूत त्याचे बरोबर असतातच. रस्त्यातील वनातून जातांना खाली तप्त वाळू आणि वरून अतिशय कडक असे ऊन. प्रेतात्म्याला खूप कष्ट होतात. पण यमदूत त्याला फरपटत, प्रहार करत जबरदस्तीने घेऊन जातात. ते कष्ट भोगत असतांना, त्याला आपला गतजन्म आठवतो. तेथील वर्तनाची आठवण होते. तो म्हणतो, **मला चौऱ्याऐंशी लक्ष योनीतील सर्वात आनंददायक आणि पवित्र असा मनुष्यजन्म मिळाला. पण मी धर्माप्रमाणे आचरण केले नाही.** आळस आणि निद्रा ह्यातच वेळ घालवला. सर्व तऱ्हेच्या शिष्टाचारांचा मी त्याग केला.

ज्या शौच म्हणजे शुद्धतेने धर्माची वाढ होते. तप वाढते. अंतरबाह्य मलाचा नाश होतो. त्या शुद्धतेला मी विसरून गेलो. परंतु ज्या परनिंदेमुळे नरक प्राप्त होतो. अविवेकाने तिच निंदा मी केली. बायको, पुत्र आणि घर यांच्यासाठीच सर्व जन्म वेचला. त्यांना संतोष देण्यासाठी अत्यंत कष्ट केले. अन्नदानासाठी काहीच द्रव्य खर्च केले नाही. कुठल्याही प्रकारचे दान केले नाही. किंवा हवनही केले नाही. परम-पवित्र अशा भागीरथीचे जल प्राशन केले नाही. मनुष्य आणि पशु-पक्षांना अन्न तर सोडाच, पण पाणीही दिले नाही. शास्त्रात जे पाच यज्ञ सांगितले आहेत. ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ व शीतवारितर्पण म्हणजेच पितृयज्ञ (थंड पाण्याने पितरांचे तर्पण) ह्यापैकी एकाही यज्ञाचे अवलोकन केले नाही. लोभ-काम-क्रोध यांचे आचरण करून प्राणीमात्रांशी द्रोहच केला.

मातापित्यांची सेवा केली नाही. कुठल्याच तऱ्हेची तीर्थयात्रा वा व्रत-उपवास केले नाहीत. फक्त दुराचरणाने आपल्या शरीराचे पोषण केले आणि पुत्र व भार्या यांनाच सुखी केले. त्यासाठी दुराचरणाने अपार असे द्रव्य मिळविले. तरी माझी तृष्णा शमली नाही. कळत असून परलोकाच्या सुखासाठी काहीच केले नाही. त्यामुळेच हे यमदूत मला ताडन करीत, ह्या यमपुरीच्या अतिशय त्रासदायक अशा मार्गाने नेत आहेत. आता माझ्या भार्या-पुत्रांचे काय होईल? असा प्रेतात्म्याचा आक्रोश बघून यमदूत म्हणतात. आता कोठे गेले तुझे धन, भार्या-पुत्र आणि बंधुजन? **यमराजाने अत्यंत शुभ अशी यमगीता सांगितली. ती तू ऐकली नाहीस. ऐकली असतीस तर भगवंताची भक्ती केली असतीस.** त्यामुळेच आम्हाला हे क्लेश द्यावे लागत आहेत. हे ऐकून तो पामात्मा अजूनच रडू लागतो. पण आता वेळ निघून गेली होती.

जे वर सांगितल्याच्या विरूद्ध वर्तन करतात. म्हणजे स्वधर्माने वागतात. भगवंताची भक्ती करतात. ते पुण्यवान समजले जातात. **अशा पुण्यवान लोकांना यमदूत आदराने यमपुरीस घेऊन जातात. त्यांना हे सर्व क्लेश भोगावे लागत नाहीत.** उलट पापात्म्यांचे क्लेश बघून

त्यांना वाईट वाटते. कधी कधी ते पापात्मे गतजन्मातील त्यांचे आप्तसंबंधी असतात. सांगूनही त्यांनी ऐकलेले नसते. ह्या महामार्गाचा प्रवास सुखकर होण्यास, पुण्यात्म्यांना यमदूत सहाय्य करतात. प्रथमपासून सहामासापर्यंतच्या अन्नाने प्रेतात्म्याला थोडेफार सुख लाभते. सहा महिन्यांच्या शेवटी तो याम्यपूर, सौरीपूर, नरेंद्रभवन, गंधर्वनगर, शैलाग्राम, क्रूरपूर, क्रौंचपूर, विचित्रभवन ह्या नगरांचा प्रवास करून बव्हादपूर नगरापर्यंत येऊन पोहोचतो. प्रत्येक नगरातून जातांना प्रेतात्म्याला वेगळ्या प्रकारचे क्लेश सहन करावे लागतात. शैलाग्रामात त्याच्यावर पाषाणांची वृष्टी होते. **तेराव्या दिवशी सत्पात्री ब्राह्मणांना दान करण्याची पद्धत आहे. त्या दानांमुळे प्रेतात्म्यांचा क्लेश कमी होण्यास मदत होते. छत्रदानामुळे शैलाग्रामात पाषाणांच्या वृष्टीपासून काही प्रमाणात बचाव होतो.**

## महादुर्धर वैतरणा नदी

बव्हादपूरच्या आधी महा दुर्धर अशी वैतरणा नदी आहे. गरूड पुराणात तिचे वर्णन केलेले आहे. वैतरणा नदी ही पू व रक्त इत्यादी प्रकारच्या चिखलांनी पूर्ण भरलेली आहे. त्यात अनेक प्रकारचे जीव अडकले आहेत. त्यांचे आक्रोश न ऐकण्यासारखे आहेत. त्या नदीची वाळू अत्यंत तप्त आहे. त्या ठिकाणी वृक्षाची छाया अजिबात नाही. तिचा विस्तार शंभर योजने आहे. **वैतरणा नदी पार करतांना प्रेतात्म्याला अतिशय कष्ट होतात. तिच्या तीरावर लोहासारखे चोची असलेले असंख्य पक्षी आहेत. ते प्रेतात्म्याला डंख करतात. सर्व बाजूंनी प्रेतात्मा पिडला जातो. तेथील नावाडी प्रेतात्म्यासमोर येऊन नाना प्रकारची दूषणे देतात. गतजन्मी काही दान केले असेल! भक्ती केली असेल! तरच ते त्याला नावेत घेतात. शतयोजनांचा**

**अतिशय क्लेशकारक असा मार्ग, ते विनासायास त्याला पार करून देतात.** घोर पापकर्मी पापात्मा मात्र, अनंतकाळ वैतरणा नदीत अडकून दु:ख भोगीत बसतो. इतर पापात्मे क्लेश सहन करीत, कसेतरी वैतरणा नदी पार करतात. प्रेतात्म्याच्या आप्तांनी दशग्रंथी ब्राह्मणाला दिलेली वेगवेगळी दाने, त्या प्रेतात्म्याला वैतरणा नदी पार करण्यास मदत करतात. त्याबद्दल गरूड पुराणात सविस्तर सांगितले आहे.

## वासनादेहाचा पुढील सहा महिन्यांचा प्रवास

वैतरणा नदी पार करून गेल्यावर प्रेतात्मा बव्हादपुरात पोहोचतो. तो सातव्या महिन्यात तेथे मासिक श्राद्धाचे जेवण करून पुढे दु:खदनगरीला जातो. तेथून नानाक्रूंदनपूरात प्रवेश करतो. त्याठिकाणी पुढची गती न मिळालेले घोर पापात्मा असतात. त्यांचे वेगवेगळे प्रकार आहेत. गती न मिळाल्याने ते अतिशय भयानक असे आक्रोश करीत असतात. ते ऐकूनच प्रेतात्मा घाबरतो. त्याच्या हृदयात धडकी भरते. ज्यांनी स्वहस्ते दाने केली आहेत. त्यांची येथून लवकर सुटका होते. तेथील मासिकाचे अन्न प्राशन करून प्रेतात्मा संतप्तनगरीत प्रवेश करतो. त्याला संतप्तभुवन असेही म्हटले जाते. नावाप्रमाणेच त्या नगरीत अतिशय उष्णता असते. त्याने त्याचे सर्व अवयव होरपळून निघतात. खालून-वरतून तो तप्त होतो. त्यासाठी सत्पात्री ब्राह्मणाला उपानह (जोडे), छत्री, सतरंजी, वस्त्रे इत्यादी दाने देण्याचा प्रघात आहे. त्याचा काही प्रमाणात प्रेतात्म्याला फायदा होतो. गतजन्मी मनुष्याने उन्हात होरपळून निघालेल्या वाटसरूला छायेचा आसरा दिला असेल. थंड पाणी देऊन त्याचा आत्मा संतुष्ट केला असेल. तर त्या प्रेतात्म्याला ह्या संतप्तनगरीतून प्रवास करतांना त्रास होत नाही. पुढे रौद्रपूर लागते. तेथे थोडी विश्रांती घेऊन, मासिक

श्राद्धाच्या अन्न-पाण्याचे सेवन करून तो शिताढ्य भुवनात प्रवेश करतो. त्याला पयोवर्षनगर असेही म्हणतात. तेथे घनदाट, काळ्याभोर मेघातून सतत अनिवार अशी वृष्टी होत असते. त्यात वातावरण अत्यंत शीतल. त्यामुळे प्रेतात्मा गारठून जातो. लोकरीचे वस्त्र दान केल्याने येथील प्रवास सुसह्य होतो. **मनुष्यजन्मात गरजू माणसाला केलेले लोभविन्मुख वस्त्रदान, ह्या लोकी कामास येते.** येथपर्यंत बारा मासांचा प्रवास पूर्ण होतो. नंतर मृत व्यक्तीचे वर्षश्राद्ध केले जाते. मग प्रेतात्म्याच्या परलोकातील अंतिम प्रवासास सुरुवात होते. तो बहुभीतिनगरात येतो.

## बहुभीतिनगर

**बहुभीतिनगर हे नावाप्रमाणेच भीतिदायक आहे. ही चित्रगुप्ताची नगरी आहे. अत्यंत भयंकर असे अठ्ठावीस नरक ह्या नगरीत आहेत.** तेथील खगपती नावाने प्रसिद्ध असलेले यमराजाचे दूत प्रेतात्म्याला ताडन करीत, ह्या सर्व नरकातून फिरवून आणतात. तेथील वेगवेगळ्या प्रकारच्या यातना भोगीत असलेले पापात्मे बघूनच त्याची गाळण उडते. आपल्याला अशाच प्रकारच्या यातना भोगाव्या लागतील. ह्या कल्पनेनेच तो रडू लागतो. यमदूत त्याला आणखीनच मार देतात. म्हणतात, गतजन्मी कोठे गेली होती तुझी बुद्धी? तू कधीच दानधर्म केला नाही. भक्ती केली नाही. फक्त स्वत:चा आणि भार्या-पुत्रांचाच विचार केलास. आता भोग त्याची फळे. म्हणत म्हणत त्याला यमपुरीत घेऊन जातात. **यमपुरीला धर्मराजपुरी, संयमिनीनगरी असेही म्हणतात.**

**गत जन्मातील स्वधर्माने वागणारे, शिव-विष्णूची भक्ती करणारे, यथाशक्ती दानधर्म करणारे, अतिथी धर्माचे पालन करणारे गृहस्थाश्रमी लोक. हे सर्व मृत झाल्यानंतर त्यांचे प्रेतात्मे ह्या**

**बहुभीतिनगरातून प्रवास करीत नाहीत. त्यांना खगपती म्हणजेच यमदूत आनंदाने त्यांचा हात धरून, धर्मराजपुरीत घेऊन जातात. वर आपण पाहिलेल्या बारा मासातील यमलोकीच्या प्रवासातपण त्यांना त्रास होत नाही. यमदूत त्यांचे हितकर्ते असतात. म्हणून मृत्युच्या समयीपण असे लोक आनंदी दिसतात. मृत्युच्या थोडा वेळ अगोदर त्यांना दिसलेले यमदूत क्रूर नसून देवदूतासारखे प्रेमळ असतात.**

**जशी भगवत्‌गीता श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितली. तसेच गरूडपुराण हे भगवान विष्णूने स्वमुखाने गरूडाला सांगितले. दोन्ही ठिकाणी अर्जुन आणि गरूड हे निमित्तमात्र होते. भगवंताचा खरा उद्देश, मानवकल्याण हाच आहे.** भगवान विष्णु म्हणतात, हे सर्व समजावून घेऊन यमपुरीच्या मार्गातील यातना नाहीशा करणे. हे सर्वस्वी मानवाच्या हातात आहे. जन्म आणि मृत्यु ह्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. प्रत्येक मानवाला मृत्यू आहेच. त्याला हा यमपुरीचा प्रवास करावा लागणारच.

## यमपुरीची निर्मिती

परमात्म्याच्या आज्ञेनुसार ब्रह्मदेवांनी सृष्टीची निर्मिती केली. चौऱ्याऐंशी लक्ष योनी निर्माण झाल्या. त्यात मुख्य अशा चार जाती आहेत. स्वेदज (जलचर प्राणी), उद्‌भिज (वृक्षादी), अंडज (पक्षादी), आणि जारद (प्राणी, मनुष्य इ.) प्रत्येक जातीचे एकवीस लक्ष प्राणी निर्माण केले. त्या सर्व जीवात मनुष्य जन्म दुर्लभ आहे. ह्या सर्व प्राणीमात्रात परमेश्वर अंश रूपाने भरलेला आहे. **भगवान विष्णु गरूडाला सांगतात. मनुष्यजन्म हा कर्मबंधनात जखडलेला आहे. ते कर्मबंधन जन्मोजन्मी त्याच्या बरोबर असते.** ब्रह्मदेवाने प्राणी

संयमासाठी यमराजाला संयमिनीपुरीचे राज्य दिले. तिच यमपुरी. नंतर ब्रह्मदेवाने यमराजास आज्ञा केली. तू प्रत्येक मनुष्याला त्याच्या पापानुसार दंड कर. पुण्यात्म्याला पुण्यफळासाठी विष्णुकडे पाठव. यमराजांचे मन साशंक झाले. दोन्ही हात जोडून त्यांनी ब्रह्मदेवाला वंदन केले. म्हणाले, देवा इतके असंख्य नर भूतलावर आहेत. दिवसेंदिवस त्यात वृद्धी होत असते. ह्या अनंत नर-नारींची अनंत कर्मे. त्या सर्वांचा हिशेब मला एकट्याला कसा ठेवता येईल? ह्या चिंतेने मी व्यथित झालो आहे. तरी तुम्ही काहीतरी मार्ग काढा. ब्रह्मदेवांना यमराजांची अडचण समजली. **त्यांनी ताबडतोब 'श्रवण' नावाच्या बारा देवांची निर्मिती केली. त्यांचा नायक म्हणून चित्रदेवाला निर्माण केले. त्यांना वेगळी अशी अलौकिक शक्ती प्रदान केली. त्यामुळे मनुष्य काया-वाचा-मनाने जे काही कर्म, ज्या कोणत्या ठिकाणी करतो. ते सर्व त्याचक्षणी श्रवणदेवांना समजते. ते त्या सर्व कर्माचा हिशेब ठेवतात.** मनुष्य मृत झाल्यानंतर, तो जेव्हा यमनगरीत येतो. त्यावेळेस ते सर्व कर्म आपल्या नायकाला म्हणजेच चित्रगुप्ताला निवेदन करतात. चित्रगुप्त त्यातला सारांश यमदेवांपुढे ठेवतात. त्याप्रमाणे यमधर्म निवाडा करतात. **पुण्यवान माणसाला पुण्याचे फळ भोगण्यासाठी स्वर्ग किंवा अधिक उन्नतीसाठी परत मनुष्य जन्म मिळतो. तसेच घोर पापांचे फळ म्हणजेच दंड भोगण्यासाठी, प्रेतात्म्याला घोर नरकात पाठविले जाते. तर बऱ्याचशा प्रेतात्म्यांना त्यांच्या कमी-अधिक पापकर्मासाठी, मनुष्येतर योनीत जन्म दिला जातो.**

## यमनगरीचे भव्य रूप

भगवंत गरूडास सांगतात. ज्या यमनगरीत तुला कधी जाता आले नाही. ती यमनगरी कशी आहे? ते एक. यमनगरीचा विस्तार शतयोजनांचा

आहे. संपूर्ण सोन्याच्या तटाने ती वेष्टित आहे. चारही दिशांना असलेल्या चार वेशी. त्यात मोठमोठाली शोभीवंत प्रांगणे आहेत. तीन वेशींना हिरे-रत्ने, सुवर्णांनी सुशोभीत केलेल्या कमानी आहेत. यमनगरीने व्याप्त असलेल्या सप्तभूमीत, अगदी मधोमध सुंदर असा राजवाडा आहे. राजवाड्यात शोभीवंत अशी बरीचशी कलामंदिरे आहेत. स्फटिकांच्या कळ्यांनी, तो यमपुरीतील सुंदर राजवाडा नेहमीच चकाकत असतो. राजवाड्याभोवती जंबू, कदंब, अशोक, चंपक, कर्दळी इ. अनेक प्रकारचे वृक्ष आहे. अनेक प्रकारच्या सुवासिक फुलांच्या लता-वेलींनी तो सभोवतालचा भाग सुशोभित झालेला आहे. नाना प्रकारच्या सुवासिक फुलांच्या वासांनी आणि धूप, कापूर आदि गंधांनी, तो परिसर दरवळला आहे. हंस, मयुर, चक्रवाक इ. पशु-पक्षी तेथे आनंदाने विहरत असतात. तेथील कलामंदिरातून मृदुंग,शंख आणि विणा इत्यादींचे घनगंभीर असे कर्णमधुर नाद निनादत असतात. त्या यमपुरीचे उत्तरद्वार एक योजन रूंद आणि दीड योजने उंचीचे, संपूर्ण स्फटिकाचे आहे. त्याच्या मध्यभागी असलेले गोपुर संपूर्ण सोन्याचे असून, हिरे-माणिके आदि रत्नांनी मढवलेले आहे. त्याच्या आतल्या बाजूस श्रवण नावाचे बारा देव रत्नजडित सिंहासनावर बसलेले असतात.

यमदूत त्या प्रेतात्म्याला घेऊन यमपुरीच्या उत्तर द्वारातून आत येतात. यममार्गावरून येतांना भोगलेल्या अनंत यातनांनी व क्षुधा-तृष्णा यांनी पीडित असलेला तो प्रेतात्मा, यमपुरीच्या ह्या अतिप्रसन्न अशा वातावरणाने जरासा सुखावतो. **त्या श्रवणदेवांना त्या प्रेतात्म्याची करूणा येते. ते श्रवणदेव त्या प्रेतात्म्याला हितकर असा उपदेश करतात. ज्यामुळे पुढील जन्मी तरी तो प्रेतात्मा योग्य असे वर्तन करील.** अजून पुढे गेल्यावर, दीव्य अशा सुवर्ण आणि रत्नांनी सुशोभित असलेल्या उच्च सिंहासनावर यमराज विराजित झालेले असतात. **त्यांना धर्मराज म्हटले आहे. धर्माप्रमाणे आचरण करणारे, असे ते प्रख्यात देवर्षी आहेत. प्रत्येक जीवाच्या कर्माप्रमाणे न्याय करून त्यांना**

**गती देण्यात ते पारंगत आहेत. न्यायाच्या बाबतीत ते अत्यंत कठोर आहेत. कुठल्याही तऱ्हेची चूक त्यांच्या हातून घडत नाही.** त्यांच्या डाव्या बाजूस, जरा खाली असलेल्या सुंदर आसनावर चित्रगुप्त नावाचे देव बसलेले असतात. मग ते श्रवणदेव, त्या प्रेतात्म्याच्या संपूर्ण आयुष्याच्या पाप-पुण्याचा पाढा चित्रगुप्तांना निवेदन करतात. यमराज ते एकाग्रतेने ऐकत असतात.

## यमराजांची दोन रूपे

जे पुण्यवंत आत्मे असतात. त्यांना यमराजांचे विलोभनीय दर्शन सुखावून जाते. यमराज त्यांना प्रत्यक्ष भगवान विष्णुंसारखे दिसतात. मेघासारखा शामल वर्ण. अति तेजस्वी असे प्रसन्न मुखकमल. कमलपत्राप्रमाणे आकार असलेले, सुंदर असे विशाल नेत्र. कटीवरचा पिवळा पितांबर. शंख, चक्र, गदा आणि पद्माने युक्त असलेले चार विशाल बाहू. गळा सुशोभित अशा वनमालांनी संपूर्ण भरलेला. असे सुंदर विष्णूरूप पाहून, तो पुण्यात्मा अतिशय आनंदित होतो. यमराजाला मनापासून नमस्कार करतो. आणि आपले रक्षण करण्याची विनंती करतो. **जे मनुष्यप्राणी आपल्या आयुष्यात प्रतिदिन परोपकार करतात. परद्रव्य आणि परस्त्री यापासून विन्मुख असतात. मातृ-पितृ भक्त असून निरंतर देवाचे पूजन करतात. गुरूची सेवा करतात. स्वधर्माचे पालन करून पंचयज्ञाचे आचरण करतात. नित्य आपल्या पितरांचे तर्पण करून श्राद्धविधीने त्यांना तोषवितात. आदराने तीर्थस्नाने करतात. नित्य शिव-विष्णुची भक्ती निरनिराळ्या मार्गांनी करून तुलसीचे पूजन करतात. आपल्या ऐपतीप्रमाणे नित्य अन्नदान, जलदान, गोदान, भूमिदान करतात. त्यांना धर्मराजाच्या दरबारात पुण्यवान ठरविले जाते.** यमराज त्यांना आशीर्वाद देतात. मग ते

पुण्यवान प्रेतात्मे, आपला पिंडानी बनलेला वासनादेह यमपुरीत टाकून देतात. यमराज त्यांना दिव्य देह प्रदान करून आलिंगन देतात. नंतर आपआपल्या कर्माप्रमाणे स्वर्गादी लोकात पाठवितात. ते दिव्य असे अनेक भोग भोगण्यासाठी. त्यानंतर परत मनुष्य जन्मात मोक्ष मिळविण्यासाठी.

आता ज्यांनी अनंत पापकर्मे आपल्या आयुष्यात अनुसरली आहेत. त्या प्रेतात्म्यांना यमपाशाने बद्ध करून, यमदूत घेऊन आलेले असतात. त्यांना यमराजाचे रूप वेगळेच दिसते. काळाभिन्न रंग. केसाळ शरीराचा. मोठाले दात पुढे आलेला. अतिभयानक आणि विक्राळ चेहरा. डोक्यावर सोन्याचा मुकुट. बलदंड असे दोन बाहू. एका हातात यमदंड. लालभडक डोळे, जणू आगीचे लोळच. त्यांच्याकडे पहाताच पापी प्रेतात्म्याच्या अंगाला कंप सुटतो. तो थरथर कापू लागतो. आपले पुढे काय होणार? ह्या भीतिनेच त्याची गाळण उडते. तशा परिस्थितीत ते श्रवणदेव, त्याच्या पापाचा पाढा चित्रगुप्तांना कथन करतात. पुण्यही कथन करतात. पण ते अगदी नगण्य असते. यमराजांच्या निवाड्याप्रमाणे त्याची रवानगी त्वरित बहुभीतिनगरात केली जाते. ती त्याच्या पापांचा दंड भोगण्यासाठी.

## अठ्ठावीस नरकांचे बहुभीतिनगर

बहुभितीनगर हे नावाप्रमाणेच भीतिदायक आहे. पापात्म्याचा देह जरी वायुरूप असला तरी त्या नरकाच्या अतिशय दारूण अशा यातना भोगतांना त्याला क्लेश होतात. बहुभीतिनगरातील अठ्ठावीस नरक पुढीलप्रमाणे होत.

१) तामिस्त्रा २) अंधतामिस्त्र ३) रौरव ४) महारौरव ५) कुंभीपाक ६) कालसूत्र ७) असिपत्र (तीक्ष्ण धारांच्या खडकांचा नरक) ८) अंधकूप ९) सूकरमुख १०)संदंश (ज्या ठिकाणी तप्त साणशीने मांसाचे लचके

तोडले जातात.) ११) कृमिभोजक १२) वैतरणी (पू आणि रक्ताचा चिखल असलेली नदी) १३ शाल्मली १४) वज्रकंटक १५) तप्तभूमी १६) लालाभक्षक १७) विशसन १८) पूयोद १९) प्राणरोधक २०) सारमेय २१) विचीरय २२) पानपात्र २३) रक्षोदन २४) दंदशूक २५)क्षार २६) पर्यावर्त २७) सूचिमुख २८) शूलवेध.

जे लोक बलपूर्वक परस्त्री गमन करतात आणि दुसऱ्याचे धन हरण करतात. त्यांना अन्नपाण्याविरहीत तामिस्त्रा नावाच्या नरकात यातना भोगाव्या लागतात.जे वंचना करून म्हणजे दुसऱ्यांना फसवून, त्यांचे द्रव्य हरण करतात. त्यांना अंधतामिस्त्र नावाचा नरक प्राप्त होतो. जे स्वशरीराच्या बलाचा अभिमान करून, मुक्या प्राण्यांना पिडा देतात. ते महारौरव नावाच्या नरकात जातात. जे परद्रोह करून म्हणजे दुसऱ्यांचे नुकसान करून, आपल्या कुटुंबाचे पोषण करतात, त्यांना रौरव नावाचा नरक प्राप्त होतो. त्याठिकाणी आपआपल्या द्रोहानुसार पक्षी येऊन, आपल्या देहाचे लचके तोडतात. जे पशु-पक्षांचा वध करतात, त्यांना कुंभीपाक नावाच्या नरकात जावे लागते. तेथे अतिशय तप्त अशा तेलाने अंघोळ घातली जाते. ब्राह्मणाचा द्रोह करणाऱ्याला कालसूत्र नावाचा नरक प्राप्त होतो. तेथे त्याला तप्त तेलाच्या कढईत टाकले जाते. जो वेदमार्गाचा त्याग करून पाखंडी लोकांची सेवा करतो, त्याला असिपत्र नावाच्या नरकात नेऊन, तीक्ष्ण धारांच्या खडकांनी त्याचे सर्वांग छेदले जाते. जे ब्राह्मणाचा देह दुखवितात. त्यांना सूकरमुख नावाचा नरक प्राप्त होतो. जे कृषि-कीटकांचे संहार करतात. त्यांना अंधकूप नावाचा नरक प्राप्त होतो. तेथे अनेक प्रकारचे जंतू त्यांना डंख करतात. जे ब्राह्मणाचे धन हरण करतात. त्यांचे मांस तप्त शस्त्रांनी तोडले जाते. जो परस्त्रीगमन करतो किंवा जी नारी जाराबरोबर रममाण होते. त्यांना यमदूत अत्यंत तप्त अशा लोहमूर्तीला आलिंगन देण्यास भाग पाडतात.

जे दंभयज्ञ करून पशूंचे बळी देतात. त्यांना अनेक प्रकारचे जंतू डसतात. तसेच एक लक्ष बाणांनी त्यांचे शरीर छेदले जाते. जे बनावट

रितीने व्यापार करतात आणि खोटी साक्ष देतात. त्यांना शतयोजने उंच पवर्तांवरून उलटे करून ढकलून देण्यात येते. जे दुसऱ्यांशी क्रूरपणे वागतात आणि सूरापान करतात. यात स्वत:च्या बायको-मुलांशी क्रूरपणे वागणाऱ्या लोकांचा समावेश होतो. **आपल्या बायको-मुलांशी कसेही वागण्याचा आपणास अधिकार नाही.** त्यांना लालभडक गरम अशा लोहरसात टाकून देतात. जारण-मरण विद्येने जे दुसऱ्यांचे प्राण हरण करतात. त्यांच्या देहाचे लचके राक्षसांकडून तोडले जातात. ते राक्षस आनंदाने त्यांचे रूधिरपान करतात. म्हणजेच रक्त प्राशन करतात. जे घरात, गावात अथवा अरण्यात विश्वासघात करतात. त्यांना शूलप्राय नावाचा नरक प्राप्त होतो. तेथे लोखडांच्या चोची असलेले कावळे आणि बगळे असतात. ते त्यांच्या शरीराचे लचके तोडतात. जे घरी आलेल्या अतिथीला क्रोधपूर्वक हाकलून देतात. वज्राप्रमाणे चोची असलेली बदके त्यांचे नेत्र फोडतात. जो कंजूष मनुष्य पैसा खर्च होतो म्हणून तीर्थयात्रा करीत नाही, दान करीत नाही, तोही निश्चितपणे नरकाचा धनी होतो. ज्याला धर्माचरण आवडत नाही. जो कधीही व्रते, दान करीत नाही. शिव-विष्णुच्या भक्तीपासून विन्मुख असतो, त्याला कल्पांतापर्यंत नरक यातना भोगाव्या लागतात.

**गरूडपुराणातील हे सर्व नरकांचे वर्णन. मनुष्य जन्मात केलेली पातके आणि त्यानुसार भोगाव्या लागणाऱ्या नरकयातना. ह्या सर्वांचे अवलोकन केले असता, आपणासारख्या सामान्य माणसांना पापकर्म करीत असता नक्कीच भीति वाटेल आणि ती पापकर्मे टाळण्याचा आपण प्रयत्न करू. हे निश्चितच. पण पूर्वजन्म, पुनर्जन्म हे सर्व खोटे आहे. फक्त वर्तमान जन्म खरा, असे मानून वासनापूर्तीसाठी पापकर्म करणाऱ्या लोकांचे काय? अशी वृत्ती होणे, हे त्यांचे प्रारब्धच म्हटले पाहिजे.**

पुढे भगवान विष्णु गरूडाला सांगतात- जो सर्वकाल माझे नामस्मरण करतो, माझे स्मरण करतो, तो ह्या सर्व पापरूपी रोगातून मुक्त होतो.

तसेच ह्या दारूण यातनातूनही मुक्त होतो. जरी आयुष्याच्या पूर्वार्धात थोडीफार पापकर्मे केली असतील. नंतर पश्चातापाने तो मला शरण आला. तरी मला त्याची करुणा येते. त्याला प्रायश्चित देऊन मी त्याचा उद्धार करतो. त्याला सन्मार्गाने वागण्यास प्रवृत्त करतो. मग तो माझ्या भक्तीत लीन होतो आणि शेवटी मी त्याला मुक्त करतो. वाल्याकोळ्याचे रूपांतर वाल्मिकीऋषित झाल्याचे उदाहरण आपल्या डोळ्यासमोर आहेच. त्याकरिता प्रायश्चित्त म्हणून त्याने हजारो वर्षे कठोर तपश्चर्या केली.

**जो नेहमी सत्य बोलतो; पण कधी कधी त्याला गो-ब्राह्मणाचे हितासाठी, स्त्रीयांच्या जीवीत रक्षणासाठी किंवा कोणाच्या प्राणरक्षणासाठी खोटे बोलावे लागते. तरी त्याला त्या असत्याचा दोष लागत नाही. यमदरबारात ते असत्य सत्यच ठरते. पण स्वत:च्या हितासाठी असत्य बोलणे मात्र पाप आहे.** स्थिर स्वभावाचे शांत लोक, दयाळू आणि क्षमावंत नर, नेहमी दान करणारे आणि आपल्या संतोषयुक्त भाषणाने सर्वांना प्रिय असणारे लोक. हे सर्वजण माझ्या पुरात येऊन पोहचतात. जे कधीही परोपकार करीत नाहीत. ते मेल्यावर पिशाच होतात आणि स्वगृही वास करतात. **जे सदासर्वकाळ आपले धन धर्मार्थ कार्यासाठी उपयोगात आणतात. ते मनुष्यरूपात असलेले माझे अंशच आहेत. असे भगवान विष्णू गरूडाला सांगतात.**

## गरूडपुराणात सांगितलेले पुनर्जन्म

भगवंत गरूडाला मनुष्याची कर्मगती सांगतांना म्हणतात. अधर्माने वागणाऱ्याचे अहित होते. तो यमदंडाला प्राप्त होतो. ज्याची शास्त्रावर भक्ती नसते. तो नास्तिक समजावा. त्याच्याशी भाषणसुद्धा करू नये. जे अहोरात्र माझी भक्ती करतात. ते अखंड स्वर्गसुख भोगतात. परत जन्माला

आल्यावर त्यांना दिवसरात्र सत्संग घडतो. **कुसंग हेच महापाप आहे. नेहमी साधुंचा, संतांचा संग करावा, त्याने सद्गती मिळून स्वर्गस्थानाची प्राप्ती होते.** आता पापी लोकांना कसे जन्म मिळतात! ते ऐक. जे नेहमी विनाकारण वाद घालतात, चहाडखोर असतात. त्यांना हरिणाचा जन्म मिळतो. जे कंजूष वृत्तीने वागतात. त्यांना रोगी मनुष्याचा जन्म मिळतो. हिंसक प्राण्यांना वृक्ष-पाषाणांचा जन्म मिळतो. जे लोक निद्राळू, क्रूर, नास्तिक आणि दृष्ट असतात. त्यांना पक्षांचा जन्म मिळतो. ब्रह्महत्या करणारा चांडाळ होतो. सूरापान करणाऱ्यांना कृमी आणि कीटकांचा जन्म मिळतो. सुवर्णाची चोरी करणाऱ्यास गवत आणि लता-वेलींचा जन्म मिळतो. चाऱ्याची चोरी करणारा अरण्यात मयुर होतो. धान्य चोरणाऱ्याला उंदराचा जन्म मिळतो. तर फळांची चोरी करणारा वानर होतो. शिजवलेले अन्न चोरणारे कावळे होतात. मध चोरणाऱ्यांना क्रूर मधमाशांचा जन्म मिळतो. गाई चोरणारे घोरपड होतात. मिठाची चोरी करणाऱ्यांना चिमणीचा जन्म मिळतो. **लहान लहान चोऱ्या करतांना लोभी माणसाला काहीच वाटत नाही. पण त्याचे पर्यावसन अशा शिक्षांनी होत असते. हे आपण लक्षात घेतले पाहिजे.**

## सर्वश्रेष्ठ अन्नदान

**अन्नदान हे सर्व प्रकारच्या दानांमध्ये श्रेष्ठ समजले जाते. देव,ऋषी, मनुष्य, पशु-पक्षी इ. सर्वांचे पोषण अन्नाने होते. अन्नाचे प्राशन केले असता, सगळेच संतुष्ट होतात. भुकेला असणाऱ्यास अन्न दिले. तर त्याचा आत्मा संतुष्ट होतो. अन्नदान करतांना ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र असा भेदभाव करू नये.** तसेच पशु-पक्षांनाही आहार द्यावा. आपल्या वाटेचे अन्न कमी करून भुकेल्या माणसास दिले.

तर त्याचे पुण्य फार मोठे आहे. **आपण आपल्याला नको असलेले अन्न, उरलेले अन्न भिकाऱ्याला देऊ करतो. ती सोय झाली. खरे अन्नदान नव्हे.** पितृलोकात रहाणारे पितर पण अन्नाची इच्छा करतात. ते म्हणतात. आमच्या कुळातील पुत्र-पौत्रांनी अन्नदान केले. तर ते आम्हाला मिळते. आम्ही त्यांना आशीर्वाद देतो. देवाइतकेच आपल्या पितरांचे पण आशीर्वाद महत्त्वाचे आहेत. अन्नदानाने मनुष्यास स्वर्गाची प्राप्ती होते. तसेच वर्तमान जन्मात त्यांना कन्या, पुत्र, धन, सुख-समाधान यांची प्राप्ती होते. मोठमोठे राजवाडे, शयनगृह, सुवर्णाअलंकार मुबलक असतील. पण दुष्काळामुळे खायला अन्न नसले तर, त्याचा काय उपयोग? मनुष्याची काया सुकून जाईल. प्राण कंठाशी येईल. मग राजवाडे, सुवर्णालंकार त्याला सुख देऊ शकणार नाहीत.

**गरूडपुराणात भगवान विष्णुंनी सांगितलेली एक कथा. अन्नदानाचे महत्त्व सांगून जाते.** भगवान विष्णु म्हणतात. मी जेव्हा रामावतारात होतो. तेव्हा अगस्ति मुनींनी मला कथन केलेली, ही कथा आहे. अगस्तिमुनी तीर्थयात्रा करीत करीत एका सुंदर अशा अरण्यात पोहोचले. त्याठिकाणी अनेक प्रकारचे फळा-फुलांनी बहरलेले वृक्ष होते. चक्रवाक आणि कारंडव नामक पक्ष्यांनी व्यापलेले. एक योजना विस्तार असलेले सुंदर सरोवर माझ्या दृष्टीस पडले. त्या सरोवराच्या काठावर मी एक रात्र राहिलो. पहाट झाल्यावर एक अपूर्व असे दृश्य माझ्या नजरेस पडले. एक सुपुष्ट आणि भलेमोठे मनुष्याचे शव, त्या सरोवराच्या काठावर पडले होते. वस्त्रालंकारांनी ते सुशोभित वाटत होते. नुकतेच चेतनाहीन झाले असावे. मी एका भल्यामोठ्या वृक्षाच्या मागील बाजूस बसलो होतो. तेवढ्यात आकाशातून एक दिव्य विमान, त्या प्रेताच्या बाजूला येऊन थांबले. एक दिव्य देहधारी देवता त्यातून बाहेर पडली. तिच्या सर्वांगातून पिवळसर प्रकाश परिवर्तीत होत होता. मला विस्मय वाटला. मी एकटक तिकडे पाहू लागलो. त्या देवतेच्या भोवती सुंदर सुंदर अप्सरांचा समूह होता. त्या अप्सरा त्याला आपल्या नृत्य-गायनाने

तोषवित होत्या. स्वर्गीय वाद्यांचा दिव्य नाद ऐकू येत होता. परंतु त्या देवतेचे मुखकमल मात्र खिन्न दिसत होते. त्याने हाताने इशारा करून त्या अप्सरांना थांबविले. तो एकटाच त्या सुपुष्ट शवाकडे आला. त्याचे बाजुला बसला. त्याचा जीव भुकेने अत्यंत कासाविस झाला होता. त्याने यथेच्छ त्या शवाचे रुधिर-मांस भक्षण केले. तृप्त झाला. चेहऱ्यावर तृप्ती दिसत होती. तरीही ते शव तसेच होते. छिन्न-विछिन्न देह परत मूळ पदावर आला होता.

अगस्तिमुनी रामाला म्हणाले, मला रहावले गेले नाही. मी पुढे गेलो. त्या दिव्य देहधारी पुरुषाची निंदा केली. त्याला विचारले, तू कोण आहेस? अशा प्रकारचे निंद्य कृत्य का करतोस? अशा प्रकारच्या बिभत्स आहाराचे कारण काय? माझे बोलणे ऐकून तो देवतास्वरूप पुरुष थांबला. त्याचा चेहरा खिन्न झाला होता. त्याने मला ओळखले. तो म्हणाला, हे महामुने अगस्ति. माझे वृत्त ऐक. माझ्या कर्माची गती ऐक.

पूर्वी विदर्भ देशात सुदेव नावाचा लोककल्याणकारी कीर्तिवंत राजा होऊन गेला. त्याला दोन सुंदर पतीव्रता भार्या होत्या. त्याचा मी जेष्ठ पुत्र. माझे नाव श्वेत. माझा धाकटा बंधु सुरथ. काही कालानंतर माझ्या पित्याचे निधन झाले. मग मला राज्याभिषेक करण्यात आला. मी अनंत वर्षे न्यायाने राज्य केले. प्रजेचे पुत्राप्रमाणे पालन केले. **परंतु माझ्या आयुष्यात मी कधीही अन्नदान केले नाही. ब्राह्मणांना व भुकेल्या लोकांना कधीच अन्न दिले नाही. इतर प्रकारचा पुष्कळ दानधर्म केला. गोदान केले. द्रव्यदान केले, वस्त्रदान केले. भूमिदान केले. परंतु माझ्या दुर्दैवाने अन्नदानापासून मात्र वंचित राहिलो.** मी उतारवयात आलो. माझ्या मनात विरक्ती निर्माण झाली. मग मी माझे राज्य, माझ्या धाकट्या भावाच्या म्हणजेच सुरथाच्या स्वाधीन केले. आणि संन्यास धारण करून वनात प्रवेश केला.

फिरता फिरता आज ज्या वनात आपण आहोत. त्या वनात प्रवेश केला. त्यावेळी हे वन अत्यंत दारुण असे होते. पाण्याचे दुर्भीक्ष. संपूर्ण

वनातील झाडे वाळून गेली होती. त्या ठिकाणी मी घोर अशा तपाला सुरवात केली. जवळ जवळ हजार वर्षे तप केले. माझा मृत्युसमय जवळ आला. माझ्या तपोबलाने हे सुंदर असे विस्तीर्ण सरोवर निर्माण झाले. झाडे फळा-फुलांनी बहरून गेली. मी मोठ्या संपन्न मनाने मृत्युला आलिंगन दिले. यमराजांनी मला हा दिव्य देह प्रदान केला आणि पुण्यफळ भोगण्यासाठी विमानात बसवून, ब्रह्मलोकात माझी रवानगी केली. मी संतुष्ट झालो. ब्रह्मलोकातल्या दिव्य आनंदाचा स्वाद घेऊ लागलो. असंख्य अशा अप्सरा माझ्या दिमतीला होत्या.

दोन दिवस आनंदात गेले. मुनीराज, मग मात्र मला कडकडून भूक लागली. क्षुधा-तृष्णेने व्याकूळ झालो. मी अन्नाचा शोध घेऊ लागलो. मात्र ब्रह्मलोकात मला खावयास काहीच मिळाले नाही. माझे प्राण कंठाशी आले होते. मी त्वरित ब्रह्मदेवाकडे गेलो. माझी स्थिती वर्णन केली. मी आता कशाचा आहार करू? म्हणून विचारले. ब्रह्मदेव जरा गंभीर झाले. म्हणाले, तू तुझा स्वदेह भक्षण कर. तुझ्या तपोबलाने तो पुष्ट झाला आहे. तू जेथे तप केलेस, त्या सरोवराकाठीच तुझा पुष्ट झालेला मृतदेह ठेवलेला आहे. रोज तू विमानातून तेथे जा. त्या देहातले रुधिर-मांस भक्षण कर. आणि तुझी क्षुधा-तृष्णा शमव. तुझ्या मांस भक्षणानंतर, तो मृतदेह पूर्ववत तसाच पुष्ट होईल. अनंतकाळ पर्यंत तुला त्या देहाचे भक्षण करता येईल.

**पुढे ब्रह्मदेव म्हणाले, अरे श्वेतराजा. पूर्वकाळी तुझ्या आयुष्यात भूतलावर असतांना तू काहीच अन्नदान केले नाहीस. संन्यासी, अतिथी तुझ्या दारावर आले असतांनाही, तू त्यांना कधीच अन्न दिले नाहीस. त्यांची क्षुधा-तृष्णा शमविली नाहीस. तो दोष तुला आता ब्रह्मलोकात भोवतो आहे.** तुझ्या इतर पुण्यकर्मांमुळे आणि तपश्चर्येने, हे पुण्यपुरुषा तुला हा दिव्य देह आणि ब्रह्मलोक प्राप्त झाला आहे. येथे अनेक प्रकारच्या विलासांची तुझी व्यवस्था झाली आहे. **पण तुझ्यासाठीच्या अन्नाची मात्र व्यवस्था**

**होऊ शकली नाही. त्यासाठी भूतलावर तू काहीच केले नाहीस. त्याचे फळ तुला भोगावेच लागेल. त्यावेळेस अन्नदानाचे महत्त्व मला कळले. पण वेळ निघून गेली होती**. त्यामुळे दररोज मला हे बिभस्त कृत्य करून, माझी भूक शमवावी लागते. माझ्या क्षुधा-तृष्णेची तृप्ती झाली की, मी परत ब्रह्मलोकात जातो. इतर सर्व भोगांचा आस्वाद घेतो.

हे महामुने अगस्ति त्यावेळेस मी ब्रह्मदेवाला शरण जाऊन, ह्या निंदय कृत्यापासून माझी सुटका कधी होईल? असे विचारले होते. **ब्रह्मदेव म्हणाले, राजा असा अनंत काळ गेल्यानंतर, अगस्तिमुनी, तीर्थयात्रा करीत त्या ठिकाणी येतील. ते तुला हे बिभत्स कृत्य करतांना बघतील. ही हकिकत तू त्यांना सांग. त्यांना तुझी दया येईल. इंद्रादी देवांना आहार देण्याचे सामर्थ्य त्यांचे ठिकाणी आहे. तर तुझी काय कथा?** गेली कित्येक वर्षे रोज मी त्या दिवसाची आतुरतेने वाट पहात होतो. आणि अशा बिभत्सरितीने माझ्याच शवाचे ग्रहण करीत होतो. ते नाईलाजानेच. **आज तो सुदिन उगवला**. असे म्हणून तो राजा श्वेत रडू लागला. त्याने अगस्तिमुनींच्या पायावर लोटांगण घातले. **कसेही करून या पापातून मला बाहेर काढा**. म्हणून त्यांचे चरण अश्रूंनी धुवू लागला. अगस्तिमुनी म्हणाले, हे रामचंद्रप्रभू, त्यावेळेस माझे हृदय करूणेने भरून गेले. श्वेतराजाच्या दु:खाने माझ्या डोळ्यांतून अश्रुपात होऊ लागला. वज्रासमान कठीण असलेले माझे हृदय, असे कधीच द्रवले नव्हते. दोन्ही हात धरून मी राजर्षीला उठवले. म्हणालो, हे राजर्षी पश्चातापाने पोळून तुझे हृदय अंतर-बाह्य शुद्ध झाले आहे. मग मी माझ्या दिव्य दृष्टीने त्या श्वेतराजाकडे नजर टाकली. ती त्याच्या उद्धाराकरीताच. ऋवेतराजाचे दिव्य शरीर अजूनच उजळले. माझ्या दिव्य दृष्टीने त्या प्रेतशरीराचा नाश केला. माझ्या आशीर्वादाने त्याच्या सर्व कर्मांचा नाश झाला. मला वंदन करून, तो राजा संतोषाने विमानात बसून सर्व अप्सरांसह ब्रह्मलोकात निघून गेला. त्याच्या सर्व कर्मांचा

नाश झाल्याने तो ब्रह्मरूपात विलीन झाला.

**म्हणून हे रघूनंदना, मनुष्याने अनुदिन म्हणजे प्रत्येक दिवशी भूतलावर अन्नदान करावे. जगन्नाथ विश्वात्मा असलेल्या रामा, तुला काही सांगायला नको. पण तुझ्या ह्या मनुष्य जन्मात तू पण दर दिवशी अन्नदान करून पावन हो. भगवान विष्णु म्हणतात, अगस्तिमुनींचे हे वचन ऐकून रामजन्मात, मी पण नित्य अन्नदानाला सुरवात केली. आपण सर्वांनी त्यापासून बोध घेतला पाहिजे.**

कर्मबंधनाचे शास्त्र पहात पहात आपण येथपर्यंत आलो. आपल्या जीवनात आपल्या डोळ्यासमोर, काही घटना घडत असतात. त्या घटनांमागची कारणे शोधू गेल्यास ती सापडत नाहीत. **शेवटी 'प्रारब्ध' 'परमेश्वराची इच्छा.' असेच म्हणावे लागते.** पण त्या घटना आपल्या मनाला चटका लावून जातात. माझ्या आयुष्यात घडलेल्या काही घटना, मी दुसऱ्याकडून ऐकलेल्या काही घटना माझ्या हृदयात खोलवर जाऊन बसल्या होत्या. हे लेखन करीत असताना त्या मला आठवल्या. कर्मबंधनाशी त्या घटनांचा नक्कीच काहीतरी संबंध आहे. त्या वाचकांसमोर ठेवाव्यात. असे माझ्या मनात आले. त्या घटनांचा विचार करून, आपणास काहीतरी शिकता येईल. मनुष्यजन्मातले कर्मबंधनाचे गाठोडे सैल करण्यास त्याचा नक्कीच उपयोग होईल. फक्त त्या घटनातील पात्रांच्या नावाचा मी उल्लेख करणार नाही. तसे करणे औचित्याला सोडून होईल.

## स्वतःच्या आईला लुटणारा मुलगा

मुलूंड हे मुंबईतले एक उपनगर. मुंबईपासून २० कि. मी. अंतरावर असणारे. ही साधारण १५ वर्षांपूर्वीची मुलूंडमध्ये घडलेली गोष्ट. त्यावेळेस मुलूंड आजच्या इतके गजबजलेले शहर नव्हते. एक सद्गृहस्थ

बँकेत ऑफीसर. पत्नी आणि एक मुलगा असे त्रिकोणी कुटुंब. मध्यमवर्गीय कुटूंबातील सुखाचे आयुष्य जगत होते. मुलगा इंजीनियर झाला. चांगली नोकरी मिळाली. मुलाचे लग्न झाले. ते गृहस्थ रिटायरमेंटच्या जवळ आले होते. पैसा हाताशी होता. एक छोटासा बंगला खरेदी केला. पत्नी सुस्वभावी. मुलगा-सूनपण चांगल्या स्वभावाचे. मुलाला अमेरिकेत चांगली नोकरी मिळाली. तो बायकोसह अमेरिकेत स्थायिक झाला. त्याला एक मुलगापण झाला.

इकडे ते सद्‌गृहस्थ रिटायर्ड झाले. बऱ्यापैकी पैसा हातात आला. तो जपून बँकेत ठेवला. त्याचे व्याज आणि रहाता बंगला. दोघांचे छान चालले होते. तिकडे मुलगा पण सुखात होता. मधून मधून आई-वडिलांना भेटायला यायचा. ह्यांनापण अमेरिकेत बोलवायचा. पण जाणे झाले नव्हते. **ते गृहस्थ बायकोला नेहमी सांगायचे. सगळे बँकेचे व्यवहार बघ. माझ्यानंतर ते तुलाच सांभाळायचे आहेत. नीट सांभाळलेस तर, आयुष्यात काही कमी पडायचे नाही**. पण ती साधीभोळी, घर सांभाळणारी बाई. तिने कधीच त्यात स्वारस्य दाखविले नाही. चांगली शिकलेली होती. तरी नवरा आहेना! मग काय करायचे! अशी भावना. अशी दोन-तीन वर्षे गेली. चांगली सुखात.

एक दिवस ते सद्गृहस्थ अकस्मात मृत्यु पावले. सिव्हीयर हार्ट ॲटॅक होता. त्या बाईतर खचूनच गेल्या. जवळचे काही नातेवाईक मुंबईत होते. त्यांच्या मदतीने सर्व सोपस्कार केले गेले. दोन दिवसांनी मुलगा-सून-नातू आले. पंधरा दिवसांनी परत गेले. काळ कोणासाठी थांबत नसतो. सर्व पैसा, बंगला बाईंच्या नावावर झाले. देव दर्शन, भजनी मंडळ, आजूबाजूंच्या बायकांबरोबर बोलणे. ह्या सर्वात वेळ जाऊ लागला. पण मनातून मात्र दुःखी होत्या. मुलाचा मधून मधून फोन यायचा. जरा बरे वाटायचे. सहा महिन्यानंतर मुलगा पंधरा दिवसांची सुटी काढून आला. आईशी मोठ्या प्रेमाने बोलला. आईलापण खूप समाधान वाटले. म्हणाला, आई मी तुझा एकटाच मुलगा. पण नोकरीसाठी नाईलाजाने

मला अमेरिकेत रहावे लागते. तू पण इथे एकटीच. त्यापेक्षा तू कायमची अमेरिकेत चल. माझ्याजवळ रहा. माझे घर चांगले मोठे आहे. नातवंडात तुझा वेळ चांगला जाईल. भोळीभाबडी प्रेमळ आई. लगेचच हो म्हणाली. तिला खूप आनंद झाला. मुला-नातवंडात रहायला मिळणार. दिवस कसातरी जायचा. पण रात्र एकटेपणाने खायला उठायची.

मुलाने आईचा अर्जंट पासपोर्ट काढला. अमेरिकेचे विमानाचे तिकीट काढले. अमेरिकेत जायची तारीख निश्चित झाली. बंगला विकला. मुलाने त्याचा चेक आईजवळ दिला. भोळी आई. ती मुलाला म्हणाली, अमेरिकेत मी तुझ्याजवळ रहाणार. मी काय करणार हे पैसे? मुलाने बंगल्याचे पैसे, आईचे बँकेतील पैसे सर्व आपल्या खात्यावर जमा केले. पन्नास लाखांच्यावर ती रक्कम होती. त्या बाई नातवंडाबरोबर खेळायला मिळणार! ह्याच आनंदात होत्या. बंगल्यातले फर्निचर अमेरिकेत नेता येणार नाही. म्हणून फर्निचर व इतर सर्व सामान विकले. त्याचे पैसेपण मुलाने आपल्या खात्यात जमा केले. आईनेच त्याला संमती दिली होती. अमेरिकेत जायच्या वेळी बंगला, नवीन मालकाच्या ताब्यात देण्याचे ठरले. नवीन मालकपण समजुतदार होता. बाईंच्या नवऱ्याला ओळखत होता. सर्व नातेवाईक येऊन भेटून गेले. बाईंना मधून मधून भारतात यायचे आमंत्रण पण दिले गेले. त्यावेळेस आमच्याकडेच उतरा, असा प्रेमळ आग्रहही झाला. तुमचा मुलगा किती चांगला आहे! म्हणून नातेवाईकांनी मुलाचे गुणगान केले. आई मनातून धन्य झाली. मुलाच्या प्रेमाने तिचे हृदय गहीवरून आले. बाईंचीपण साठी जवळ आली होती. तब्बेत छान होती.

जायचा दिवस उजाडला. मुंबईला एअरपोर्टहून रात्री दहाचे विमान होते. आईच्या सामानाची एक छोटीसी बॅग व मुलाची बॅग त्याच्या पाठीवरच होती. आईचा पासपोर्ट व तिकीट आईजवळच होते. मुलाचे रिटर्न तिकीट होते. दोघेजण रात्री आठलाच एअरपोर्टवर पोहोचले. सर्व चेकींग होऊन वेंटीगरूममध्ये बसले. रात्रीचे नऊ वाजले होते. थोड्याच

वेळात विमानात जायचे होते. त्या बाईंना थोडी भीति वाटत होती. त्या कधीच विमानात बसल्या नव्हत्या. मुलगा धीर देत होता. तेवढ्यात मुलगा म्हणाला, आई तू येथेच बस. मी चौकशी करून लगेच येतो. आई हो म्हणाली. दहा मिनिटे झाली. पंधरा मिनीटे झाली. पण मुलगा आला नाही. त्या बाईंना काळजी वाटू लागली. मुलाला काही झाले तर नाही? आईचेच मन. तासभर झाला. मग मात्र बाईंना रहावले गेले नाही. तश्या त्या सुशिक्षित होत्या. रिसेप्शन काऊंटरची चौकशी केली. बाजूच्याच हॉलमध्ये रिसेप्शन काऊंटर होते. तेथे गेल्या. एक महाराष्ट्रीयन मुलगीच होती. तिला तिकीट दाखवले. ती म्हणाली, काकू हे विमानतर दहा मिनिटांपूर्वीच रवाना झाले. तुम्ही कुठे होत्या? तुमचे विमान चुकले. त्या बाई एकदम सुन्न झाल्या आणि रडायला लागल्या. ती मुलगी समोर आली. नवीन नात्याच्या काकूंना सावरले. बाजूला बसवले. पाणी दिले. मग प्रेमाने चौकशी केली.

**त्या बाईंनी अगदी प्रथमपासूनची सर्व हकीकत त्या प्रेमळ मुलीला हुंदके देत देत सांगितली. मुलगा आपल्या सख्या आईला विमानतळावरच सोडून गेला होता. जातांना तिचे सर्वस्व लूबाडून नेले होते. अगदी रहायचा बंगला, बँकेतील पैसे सर्वच काही. फक्त अंगावरचे पातळ तेवढे सोडले होते. किती हा क्रूरपणा! केवढी दुट्टपी वागणूक! शेवटपर्यंत बिचाऱ्या प्रेमळ आईला आपल्या मुलाचीच काळजी. तिला ह्या सर्व बनवाबनवीची शेवटपर्यंत जाणीव झाली नाही. काय पाप केले होते, त्या बिचाऱ्या आईने? मुलावर केलेले निस्वार्थ प्रेम. ह्याला पाप म्हणता येईल का? हे सर्व ऐकून ती प्रेमळ मुलगी, स्वत:च रडू लागली. ह्या सुशिक्षित लोकांच्या पैसेवाल्या घरात अशी घटना घडू शकते! कोणी कल्पनाच करू शकत नाही.**

त्या मुलीने स्वत:ला सावरले. ती ड्यूटीवर होती. सोबतच्या मैत्रिणीला कामाचे बघायला सांगितले. अजून प्रेमाने काकूंची विचारपूस

केली. कल्याणला काकूंचा सख्खा भाऊ रहात होता. त्याचा फोननंबर काकूंजवळ होता. तिने काकूंच्या भावाला फोन करून सर्व हकिकत सांगितली. एवढ्या रात्री भाऊ एअरपोर्टवर आला. बहिणीला घेऊन आपल्या घरी कल्याणला गेला. **त्या मुलाचा नंतर काही फोन पण आला नाही. ना त्याचा पत्ता कोणाजवळ होता. बिचाऱ्या काकू. काय त्यांची परिस्थिती झाली असेल? काय सांगणार लोकांना? स्वतःच्या मुलाने लुबाडले म्हणून? त्यांचे हृदयच फाटून गेले असेल! ऐकूनच आपले हृदय सुन्न होते.** पण त्या बाई मोठ्या धिराच्या. भावाची परिस्थिती बेताची. स्वतःजवळ तर काहीच नाही. मग कसे भावाजवळ रहायचे! त्यांचा स्वाभिमान जागृत झाला. नवऱ्याने वेळोवेळी केलेला सदुपदेश आपण कसा विसरून गेलो? काहीच कसा विचार केला नाही? प्रारब्धच म्हणायचे. त्यानेच तशी बुद्धी झाली. पण मुलाचे काय? कोठून एवढा क्रूरपणा मनात आला? हे सर्व करतांना त्याचे मन जराही कचरले नाही? **केवढा हा विचित्र लोभ? मनाची सदविवेक बुद्धी नाहिसा करणारा!**

त्या बाई मुलूंडला आल्या. त्यांना ओळखणारी खूप कुटूंबे होती. सगळी सज्जन. त्या विकलेल्या बंगल्याच्या मालकाने, छोटेसे आऊटहाऊस त्यांना रहायला दिले. काहीही भाडे घेतले नाही. **खरे तर सर्व बंगला त्यांचाच होता. पण परिस्थितीने दिलेली कलाटणी.** त्यांनी हातात लाटणे घेतले आणि चांगल्या घरच्या पोळ्या करून आपला चरितार्थ चालवू लागल्या. देवधर्मात आपला वेळ घालवू लागल्या. **त्या स्वतः ही हकिकत लोकांना सांगत. म्हणत विचार करून कुठलीही गोष्ट करा. आपल्या सारखी परिस्थिती कोणावर येऊ नये. ही त्या पाठीमागची भावना. केवढे हे मोठेपण! दुःखाने पोळूनपण चिडचिड नाही. क्रोध नाही. कसे सर्व सहन केले असेल, त्या काकूंनी! माणसाच्या हृदयातील परमेश्वर ह्यापेक्षा कोणी वेगळा असेल काय? प्रारब्ध भोग अगदी शांतपणे स्वीकारले, त्या काकूंनी.**

# आई-वडिलांसाठी बायकोला सोडणारा मुलगा

साधारण तेरा-चौदा वर्षांपूर्वीची गोष्ट. मी एन.आर. सी. कंपनीच्या कॉलनीत आंबिवली येथे रहात होतो. पत्नी सुलभा आणि दोन मुले. मोठा कॉलेजला आणि धाकटा आठवी नववीत. एन. आर. सी. च्याच शाळेत. माझा वेळ बराचसा कंपनीत जायचा. सुलभा मात्र घरचे सर्व करून महिला मंडळ, भजनी मंडळ, मैत्रिणी यात रमायची. सर्वांशी प्रेमाने बोलणे. त्यामुळे तिच्या ओळखी चटकन व्हायच्या. कंपनीत नेहमी नोकरी सोडून जाणारे. नवीन नोकरीत येणारे लोक असत. कंपनीच्या कॉलनीतले क्वार्टर्स चांगले मोठे. चोवीत तास पाणी-लाईट, मोठमोठ्या झाडांची सावली. मुंबईत रहाण्याची गैरसोय. पण येथे मात्र आरामशीर रहाणे. त्यामुळे बाहेरगावचे लोक आकर्षित होत. आपली जुनी नोकरी सोडून एन. आर. सी. जॉईन करीत.

आम्ही दुसऱ्या मजल्यावर रहायचो. त्यावेळेस पहिल्या मजल्यावर एक कुटुंब रहाण्यास आले. सी. के. पी. होते. वयस्कर आई-वडील आणि तरुण ३०-३२ वर्षांचा मुलगा. मुलगा चांगला उंचपुरा, गोरापान. आकर्षक व्यक्तिमत्त्व. आमच्या कंपनीत नवीनच जॉईन झाला होता. सुलभा गॅलरीत उभी होती. सामान ट्रकमधून उतरत होते. पहिल्या मजल्यावरच्या ब्लॉकमध्ये शिफ्टींग चालले होते. सुलभाने वयस्कर जोडप्याला बघितले. लगेचच ती खाली गेली. आजींशी ओळख करून घेतली. सामान लावेपर्यंत सर्वांना चहाला वरती बोलावून घेतले. मी ऑफीसमध्येच होतो. सुलभाला त्या आजींबद्दल आपुलकी निर्माण झाली. आणि आजींना सुलभाबद्दल. अगदी आठवडा भरातच त्यांचा आमचा घरोबा निर्माण झाला. नवीन असल्याने, सुलभाने त्यांना सगळ्या प्रकारची मदत केली. ते आजी-आजोबा आमचेकडे नेहमी यायला

लागले. माझेपण त्या कुटुंबाबद्दल चांगले मत झाले.

एक दिवस संध्याकाळी आजी-आजोबा सहजच घरी आले. एकमेकांबद्दल गप्पा चालल्या होत्या. मी घरीच होतो. सुलभाने सहजच विचारले. काहो, तुमचा मुलगा दिसायला एवढा छान आहे. अजून लग्न नाही झाले? मुली सांगून येत असतील! हे ऐकताच त्या आजींच्या डोळ्यात पाणी तरारले. त्या दोघांनाही गहीवरून आले. मग त्या आजी सांगू लागल्या. इथे येण्याआधी आम्ही नाशिकला होतो. मुलाला चांगली नोकरी होती. आमचे स्वत:चे घर होते. आजोबांना रिटायर्ड होऊन दहा वर्षे झाली होती. मुलाचे आमच्यावर फार प्रेम आहे. तो अगदी फुलासारखी आमची काळजी घेतो.

दोन वर्षांपूर्वी एक मुलगी सांगून आली. दिसायला छान. नाशिकमध्येच नोकरीपण करत होती. दोघेही एकमेकांना पसंत होते. आम्हालाही सर्व पसंत होते. दुसऱ्या वेळेस आम्ही तिघे, मुलीचे आई-वडील आणि मुलगी, त्यांच्या घरी जमलो. ते एकमेकांची आणखीन ओळख करून घेण्यासाठी. एकमेकांचे विचार जाणून घेण्यासाठी. आमचा मुलगा बोलू लागला. मुलीला म्हणाला. **मी माझ्या आई-वडिलांचा एकच मुलगा. माझी बहिण लग्न होऊन सासरी गेली. माझ्या लहानपणापासून आई-वडिलांनी खूप कष्ट करून मला वाढवले. खूप प्रेम दिले. ते आता म्हातारे झाले आहेत. माझेही त्यांच्यावर जीवापाड प्रेम आहे. लग्नानंतरपण ते माझ्याच जवळ रहातील. त्यांना तरी माझ्याशिवाय कोण आहे? मी पण त्यांच्याशिवाय राहू शकणार नाही. हे तुला पसंत असेल. तर सांग.** तुझी मते वेगळी असू शकतील. तुला हे मान्य नसेल तर, आपले रस्ते वेगळे म्हणून समजू. मुलीच्या आई-वडिलांना खूप बरे वाटले. आई-वडिलांवर प्रेम करणारा मुलगा. नक्कीच प्रेमळ असेल. आपल्या मुलीवर पण तो नक्कीच प्रेम करेल. मुलीने पण आनंदाने ते मान्य केले. थोडे दिवसातच रितसर लग्न झाले.

मुलगी आमच्या घरी आली. नोकरी करीतच होती. मी सर्व घरचे करायची. थोडाफार बाजार-हाट आजोबा करायचे. बाकी सर्व मुलगा बघत होता. मुलगा व सून दोघेही आनंदात होते. आम्हाला पण आनंद झाला. फक्त सून माझ्याशी मोकळेपणे बोलत नव्हती. अगदी तुटक वागायची. मला जरा खटकले. पण मी सावरून घेतले. असतो एकेकीचा स्वभाव! सहा महिन्यानंतर सूनेची कुरबूर सुरू झाली. ती मुलाच्या मागे लागली. आपण वेगळे राहू. मला सासू-सासऱ्यांबरोबर रहायचे नाही. तिचे आई-वडील आमचेकडे येऊन रहायचे. त्यांचे मात्र आनंदाने करायची. दोन महिने मुलाने थोडे दुर्लक्ष केले. हिने मात्र त्यासाठी भांडण सुरू केले. **आम्ही मुलाला समजावले. रहा तू वेगळा. आमचे तरी किती दिवस राहिले! तू सुखी असलास म्हणजे झाले. पण मुलगा ऐकायला तयार नव्हता.**

त्याने सुनेच्या आई-वडिलांना घरी बोलावले. आम्ही सर्वजण बसलो. मुलाने हा विषय काढला. बायकोला म्हणाला. मी लग्नाआधीच तुला स्पष्ट सांगितले होते. तेही सगळ्यांसमोर. तुला पसंत नव्हते, तर का होकार दिलास? मी काही तुला अंधारात ठेवले नव्हते. मी तुझ्यासाठी, माझ्या आई-वडिलांना सोडणार नाही. अजूनही वेळ गेली नाही. तुला माझे आई-वडील नको असतील. तर मी तुला घटस्फोट द्यायला तयार आहे. मी काही तुला फसवले नाही. अजूनही माझा आग्रह नाही. आपण दोघेही स्वेच्छेने घटस्फोट घेऊ. बराच विचारविनिमय झाला. सूनेच्या आईवडिलांनी तिला समजावण्याचा प्रयत्न केला. पण तिने ऐकले नाही. मुलानेपण तिचे ऐकायला नकार दिला. कायद्याप्रमाणे एक वर्ष ते दोघेजण विभक्त राहिले. सूनबाई माहेरी राहिली. दोन महिन्यांपूर्वीच कोर्टाकडून रितसर घटस्फोट मिळाला. मग नाशिकमध्ये मुलाचे मन रमेना. म्हणून मित्राच्या सांगण्यावरून एन. आर. सी. मध्ये अर्ज केला. नशिबाने लगेच नोकरी मिळाली. पगार पण बऱ्यापैकी वाढवून मिळाला. रहायला छान घर मिळाले. मुलाने नंतर हा विषय कधीच काढला नाही. तुमच्या समोर

मन मोकळे झाले. बरे वाटले. सुलभा आणि आजींच्या वयात खूप अंतर. पण दोघीजणी जीवाभावाच्या मैत्रिणींसारख्या एकमेकांच्या गळ्यात पडल्या. गहिवरून आले होते. ते दु:खाचे अश्रू नव्हते. तर प्रेमाचे! आजींना आपल्या मुलाबद्दलच्या प्रेमाने गहिवरून आले होते. तर सुलभाला त्यांच्या मुलाच्या कौतुकाने! मी हळूच माझ्या डोळ्यातले आनंदाश्रू पुसले. माझी आणि आजोबांची परिस्थिती काही वेगळी नव्हती.

पुढे वर्षभराने त्या मुलाचे लग्न झाले. बडोद्याची त्यांच्याच समाजातील मुलगी मिळाली. खूप मनमिळावू आणि प्रेमळ. लग्न रजिस्टर झाले. आजी मुलाला आणि नवीन सुनेला घेऊन मुद्दाम आमच्याकडे आल्या होत्या. आम्ही दोघांनीही मनापासून त्यांना आशीर्वाद दिला. पुढे त्या मुलाने एन. आर. सी. ची नोकरी सोडली. नवीन मुंबईत चांगली नोकरी मिळाली. रहायला डोंबिवलीला घर घेतले. वर्षभरातच त्यांना मुलगा झाला. आजींनी मुद्दाम सुलभाला फोन केला. आम्ही दोघेजण मुलाला पाहून आलो. नवीन सून खूपच छान होती. नोकरी करत नव्हती. आजी-आजोबांची प्रेमाने काळजी घेत होती. आजी अगदी तोंडभरून सुनेची स्तुती करत होत्या. आम्हाला दोघांनाही खूप आनंद झाला. **त्या मुलाने कायमचे माझ्या हृदयात घर केले. आई-वडिलांसाठी बायकोला घटस्फोट देणारा मुलगा. मी पाहिलाच नव्हता. त्या आई-वडिलांचे प्रारब्ध केवढे चांगले! असा मुलगा मिळण्यासाठी पूर्वजन्मी किती पुण्य केले असेल! तर नाशिकच्या मुलीचा आणि ह्या मुलाचा योग नव्हता. म्हणून असे घडले. आई-वडिलांच्या सेवेचे फळ त्याला ह्याच जन्मात मिळाले. ते दुसऱ्या प्रेमळ बायकोच्या रूपाने. लगेचच मुलगापण झाला. त्या मुलाचा कर्मयोग वाखाणण्यासारखा आहे. बायकोचा मोहपण त्याच्या कर्तव्यात अडथळा आणू शकला नाही.**

# एका मृत्यूची अजब कहाणी

ही पण गोष्ट मी एन. आर. सी. कॉलनीत रहात असतांनाच घडलेली. साधारण इ. स. २००५ चा काळ होता. रविवारी मला सुट्टी असायची. असाच एका रविवारी सकाळची पूजा-अर्चा आटोपून, पेपर वाचत बसलो होतो. घड्याळात दहा वाजले होते. मॅनेजरची पोस्ट होती. कॉलनी सोडून बाहेर जाता येत नव्हते. इलेक्ट्रीकल डिपार्टमेंट. केव्हाही ब्रेक डाऊन झाला की, लगेचच फॅक्टरीत जावे लागे. घरचा फोन वाजू लागला. काय कटकट आहे! म्हणून उचलला. समोरच्या बाजूने आवाज आला. **मी कल्याण पोलीस स्टेशनवरून इनस्पेक्टर पाटील बोलतोय. मी हादरलोच.** फॅक्टरीत नेहमीच युनियनच्या भानगडी चालू असत. आवाज जरा मधाळ करून म्हणालो, काय झाले साहेब? पोलीस इनस्पेक्टरशी बोलायचे होते. पोस्ट प्रमाणे संयम ठेवायलाच हवा.

तिकडून आवाज आला. **अर्ध्या तासापूर्वी कल्याणच्या खाडीच्या किनाऱ्यावर आम्हाला एक डेड बॉडी सापडली आहे. मी जीव मुठीत ठेऊन ऐकू लागलो. इनस्पेक्टर पुढे म्हणाले, पाण्याने भिजलेल्या त्या प्रेताच्या खिशात, आम्हाला काहीही ओळखपत्र सापडले नाही. पण त्याच्या शर्टाच्या खिशात भिजलेले एक व्हिजिटींग कार्ड सापडले. त्यावर तुमचे नाव आहे आणि हा फोननंबर दिसतो आहे. हा फोननंबर बॉलपेनने लिहिला आहे. तरीपण भिजलेल्या कार्डावरून तो मिटला नाही. म्हणून आम्ही तुम्हाला फोन केला.** तुमचे व्हिजिटींग कार्ड तुम्ही एवढ्यात कोणाला दिले होते काय? मी एकदम अवाक झालो. क्षणभर काहीच सुचेना. मग एकदम आठवले. मी म्हणालो, साहेब मागच्या रविवारी एक मध्यमवयीन गृहस्थ माझ्या परिचिताबरोबर माझ्या घरी आले होते. दुबईतील नोकरी सोडून भारतात आले. ते दोन-तीन महिन्यांपूर्वी. त्यांची बायको-मुले

कल्याणला असतात. एन. आर. सी. मध्ये नोकरीसाठी प्रयत्न करा, म्हणून विनंती करीत होते. त्यांचा अर्ज मी ठेवून घेतला आणि माझे व्हिजिटींग कार्ड दिले. इनस्पेक्टरांना जरा हायसे वाटल्यासारखे, त्यांच्या आवाजावरून जाणवले. त्यांचे नाव आठवते काय? मग मी त्यांना नाव सांगितले. काही पत्ता-फोन नंबर? मी म्हणालो, साहेब त्यांचा फोननंबर मी डायरीत लिहून ठेवला आहे. तुम्हाला देतो. इनस्पेक्टर पाटील म्हणाले, वा छान. मला वाटत होते. ह्या डेड बॉडीचा काहीच पत्ता लागणार नाही. आता जरा खात्री वाटते. तुम्ही सांगितलेले गृहस्थ हेच असावेत. मी त्यांना फोन नंबर दिला. इनस्पेक्टर म्हणाले, साहेब तुम्ही आम्हाला खूप सहकार्य केलेत. आम्ही तुम्हाला काही त्रास देणार नाही. तरी तासभराने तुम्ही कल्याणच्या खाडीवर या. तुम्ही त्या व्यक्तीला ओळखू शकाल. मी त्यांच्या घरी, मिळालेल्या फोननंबरवर चौकशी करतोच. मी फोन ठेवला.

मी व सुलभा चर्चा करू लागलो. ते आमचे परिचित गृहस्थ बऱ्याच दिवसांनी आमचेकडे आले होते. चांगले दोन तास बसले होते. सर्व चहा-फराळ सुलभाने आपुलकीने केला होता. नोकरी मागायला आलेले गृहस्थ त्यांचे लांबचे जावई होते. त्यांचा पॅकींगचा डिप्लोमा होता. आमचेकडे काही त्याचा उपयोग नव्हता. तरीपण त्यांच्या समाधानासाठी अर्ज घेऊन, दुसऱ्या दिवशी एच. आर. डिपार्टमेंटला दिला आणि मी विसरून गेलो. त्यांच्या बोलण्यावरून ते, खूपच अपसेट झाल्यासारखे वाटत होते. साहजिकच आहे. मध्यम वयात नोकरी न मिळाल्याने असे होते. तरी त्यांची बायको कल्याणला बँकेत नोकरी करीत होती. मी लगेचच त्या माझ्या परिचीत गृहस्थांना फोन केला. ते हादरलेच. त्यांनी त्या गृहस्थाच्या नातेवाईकांना फोन केला. परत मला फोन करून सांगितले. तास-दीड तासाने तू खाडीवर ये. आम्ही सर्वजण तेथे येतो.

दीड तासाने मी कल्याणच्या खाडीवर पोहोचलो. पोलीस तेथे होतेच. नुकतेच त्या गृहस्थांचे नातेवाईक, माझे परिचित गृहस्थ तेथे

आले होते. **डेड बॉडी जवळच ठेवलेली होती. दुर्दैवाने मला नोकरी मागायला आलेल्या गृहस्थांचेच ते प्रेत होते.** इनस्पेक्टर पाटलांनी माझे आभार मानले. मला साक्ष द्यावी लागली नाही. त्या गृहस्थाच्या बायको, आई, मुलांनी ते प्रेत ओळखले. ते गृहस्थ तीन दिवसांपूर्वी जोगेश्वरीला त्यांच्या भावाकडे गेले होते. तेव्हापासून घरच्या लोकांचा त्यांचेशी संपर्क नव्हता. डिप्रेशनमध्ये असल्याने त्यांनी रात्रीच्या वेळात, पुलावरून खाली उडी टाकून आत्महत्या केली असावी. मी जास्त खोलात शिरलो नाही. आपले काम झाले, म्हणून घरी परत आलो.

**मग माझ्या मनात विचार आला. गेल्या रविवारी ते गृहस्थ माझेकडे नोकरी मागण्यास आले नव्हते. तर माझे व्हिजिटींग कार्ड घेऊन जाण्यास आले होते. मला परमेश्वरी लीलेचे मोठे कौतुक वाटले! त्या गृहस्थांचे प्रेत खाडीत खूप वेळ राहिले असले पाहिजे. एवढा वेळ पाण्यात भिजूनपण त्या व्हिजिटींग कार्डावरचे माझे नाव व फोन नंबर, कसे पुसले नाही? जर ते पुसले असते. तर त्या प्रेताचा काहीच पत्ता मिळाला नसता. गावात असून पण नातेवाईकांना कळले नसते. पोलीसांनी त्या प्रेताचे बेवारशी म्हणून दहन पण केले असते. त्यांचा मृत्युयोग तर टळणार नव्हताच. पण परमेश्वराला माझ्या माध्यमातून ते प्रेत, नातेवाईकांपर्यंत पोहचवायचे होते हेच खरे. कर्माचा हा विचित्र धागा उलगडता उलगडत नाही.**

## लग्नाचे फसवे नाटक

कल्याणचे एक ब्राह्मण कुटुंब. नवरा, बायको आणि एकूलती एक मुलगी. नवऱ्याची चांगली सरकारी नोकरी. घरच्या घरी बायकोच्या शिकवण्या. स्वत:चे घर. मुलगी लाडाची. पण वळण मात्र चांगले.

पंधरा-सोळा वर्षांपूर्वीची गोष्ट. मुलगी ग्रॅज्युएट झाली. ठाण्याच्या एका कंपनीत सर्व्हीस करू लागली. मुलगी वयात आली होती. **मुलीला चांगला श्रीमंत, परदेशात नोकरीला असलेला मुलगा मिळावा. असे आई-वडील दोघांनाही वाटत होते. काय चुकीचे होते त्यात? त्यावेळेस भारतातले पगार खूपच कमी होते.** आता भारतातही चांगले पगार मिळतात. एक दिवस वर्तमान पत्रात जाहीरात आली. देखणा मुलगा. परदेशात स्थायिक. लग्नासाठी भारतात आला आहे. ग्रॅज्युएट सुंदर मुलीच्या शोधात. लग्न करून पंधरा दिवसात बायकोला घेऊन परदेशात जाणार. सध्या डोंबिवलीत वास्तव्य. पत्ता दिला होता.

नवऱ्याने जाहिरात बघितली. बायकोला दाखविली. तो सुटीचाच दिवस होता. मुलगी घरीच होती. तिघांनी चर्चा केली. श्रीमंत नवरा मिळाला, तर तिला हवाच होता. त्यांनी डोंबिवलीच्या फोनवर कॉन्टॅक्ट केला. एका वृद्ध गृहस्थांनी फोन उचलला. ते म्हणाले, लग्नाचा मुलगा माझाच. संध्याकाळी ६ ची वेळ ठरली. नवरा, बायको, मुलगी तिघेही आनंदात होते. मुलगी दिसायला चांगलीच होती. पसंत पडायचा प्रश्नच नव्हता. बरोबर सहाला डोंबिवलीच्या पत्त्यावर पोहोचले. घर खूपच चांगले होते. पहिल्या मजल्यावर. पुढचा डेकोरेटीव्ह दरवाजा आणि बाजूलाच खिडकी. वृद्ध माणसाने दार उघडले. आत या म्हणाला. लगेचच मुलाची आई पाणी घेऊन आली. मुलगा पण आला. चांगला साडेपाच फूटाच्यावर उंचीचा. सुदृढ आणि देखणा. मुलामुलीची नजरानजर झाली. दोघांच्याही डोळ्यात पसंतीची भावना होती. मुलाने घर दाखवले. दोन बेडरूम, कीचन, हॉल. मोजके फर्नीचर. छान सजवले होते. मुलगा म्हणाला, इथे आई-वडील रहातात. माझी मोठ्या पोस्टची दुबईतील नोकरी सोडता येत नाही. मुंबईतपण ऑफीस आहे. सध्या सुटीवर असलो, तरीपण मधून मधून ऑफीसचे काम बघावे लागते. मुलगा म्हणाला, मला कोणी जवळचे नातेवाईक नाहीत. हा फक्त एक जीवलग मित्र आहे. बाजूच्या मित्राची ओळख करून दिली. थोड्या

वेळाने तो मित्र कामासाठी निघून गेला.

मुलाने सांगितले. मुलगी मला पसंत आहे. मुलगी लाजली. आई-वडिलांनाही हे स्थळ पसंत होते. मुलगा एकटाच बोलत होता. मुलाचे आई-वडील फक्त ऐकत होते. कदाचित वृद्धत्व त्याला कारण असेल! मुलगा म्हणाला, आपण ताबडतोब हे लग्न करू. मला वेळ नाही. कधीही दुबईला जावे लागेल. तसेच बायकोला न्यायचे म्हणजे पासपोर्ट, व्हिसा काढावा लागेल. ते काम लग्नानंतरच करता येईल. त्यालाही पंधरा दिवस लागतील. त्या वृद्ध गृहस्थांनी आपण ब्राह्मण असून त्यांचे गोत्रही सांगितले. दोन्ही पार्टीला जन्मपत्रिका पहायची गरज वाटली नाही. मुलीचे काका, मामा दूर होते. एवढ्या घाईत त्यांना बोलावता आले नसते. **मुलाची घाई मुलीच्या वडिलांना समजत होती. पण अजून चौकशी करायला पाहिजे. हे त्यांच्या लक्षातच आले नाही. चांगले स्थळ मिळते. म्हणून तिघेही भारावून गेले होते.** लग्न तिसऱ्या दिवशी टिटवाळ्याच्या मंदिरात करण्याचे ठरले. लग्नाचा खर्च विशेष असा नव्हताच. पण लग्न चांगले वाजत गाजत केले असते तर, तीन लाख तरी लागलेच असते. मुलीच्या वडिलांनी एक लाखाचे तयार दागिने विकत घेतले. ठरल्याप्रमाणे लग्न लागले. मुलगा-मुलगी, दोघांचे आई-वडील एवढेच फक्त हजर होते. साक्षीला टिटवाळा मंदिरातील भटजी. रोख तीन लाख मुलीच्या वडिलांनी जावयाला दिले.

आता दुबईलाच जायचे म्हणून हनीमूनचा बेत कॅन्सल केला. पासपोर्ट-व्हिसाची कामे करायची होती. त्याच्या तयारीला लागले. मुलगा-मुलगी, नवरा-बायको म्हणून डोंबिवलीला रहायला लागले. आठ दिवस तिने सुट्टी काढली होती. आता लगेच राजीनामा द्यायला नको. पुढे दुबईहून पाठवून देऊ, असे ठरले. **नवऱ्याचा स्वभाव, वागणूक, सासू-सासऱ्यांचे प्रेम. यामुळे ती खुश होती. आपला आनंद ती फोनवरून रोज आई-वडिलांकडे व्यक्त करी.** आई-वडील पण दोन-तीन वेळेस भेटून गेले. आठ दिवसानंतर मुलगी परत

ड्यूटीवर जाऊ लागली. नवरापण रोज मुंबईच्या ऑफीसला जात होता. तसेच पासपोर्ट-व्हिसाचे कामपण होतेच. पंधरा दिवसानंतर त्याने सांगितले. ऑफीसच्या कामासाठी मला एक महिना मुंबईलाच रहावे लागेल. तोपर्यंत पासपोर्ट, व्हिसा दोन्हीही तयार होतील. मग आम्ही दोघे एकदमच दुबईला जाऊ. **मुलीच्या आई-वडिलांना आनंद झाला. तेवढाच महिनाभर मुलीला भेटता येईल.**

पहाता पहाता महिना झाला. मुलगी सकाळी डबा करून, घरचे आवरून ठाण्याला गेली. **इतक्या पटकन झालेले लग्न. मनासारखा नवरा. खुशीत होती. पण दैव हसत होते.** संध्याकाळी ७ वाजता नेहमीप्रमाणे घरी आली. तर घराला कुलूप. कावरी बावरी झाली. आपल्याला न सांगता सासू-सासरे गेले कुठे? नवरा उशीरा येतो. बरे आपल्याजवळ किल्लीपण नाही. **सहजच तिचे लक्ष बाजूच्या खिडकीकडे गेले. तर खिडकीचे दरवाजे उघडेच. आत डोकावले. तर सर्व घर रिकामे. फर्निचर पण नाही. ती मनातून चरकली. हा काहीतरी वेगळाच प्रकार दिसतोय.** शेजारी बाजूच्या विंगमध्ये होते. फारसा काय? काहीच संबंध नव्हता. ते म्हणाले, दुपारी दोनलाच एक ट्रक आम्ही पाहिला. त्या ब्लॉकचे सर्व सामान ट्रकमध्ये भरून घेऊन गेले. बहुतेक दुसरा ब्लॉक घेतला असावा. **तुम्ही त्यांच्या कोण? मुलीने कपाळावर हात मारून घेतला.** लगेचच वडिलांना फोन केला. वडील ऑफीसमधून नुकतेच घरी आले होते. ते बायकोला घेऊन डोंबिवलीला आले. आजूबाजूला सर्व चौकशी केली. **पण कोणालाच माहित नव्हते. ते कोण होते? आणि कुठे गेले?** नाईलाजाने मुलीला घेऊन वडील परत कल्याणला आले.

रात्रभर तिघेही सुन्न होऊन बसले होते. करायला गेलो एक आणि झाले भलतेच! कोणाला काही सांगता येत नव्हते. एवढे मुलीचे लग्न. आयुष्यातला फार मोठा प्रसंग. पण कोणाला सांगितले नाही. बोलावले नाही. **माहितीतल्या ठिकाणाची पण माणूस चार ठिकाणी चौकशी**

**करतो. पण बुद्धी कशी फिरली? तिघांपैकी कोणालाच काही सूचले नाही. कशी भुरळ पडली? प्रारब्धच माणसाला अशी भुरळ घालते आणि त्याच्या मनासारखेच होते.**

दुसऱ्या दिवशी वडिलांनी जावयाच्या मित्राचा फोन शोधून काढला. त्याला फोन केला. **तर तो म्हणाला, तो काही माझा मित्र नव्हता. तो डोंबिवलीतला ब्लॉक माझा आहे. अकरा महिन्यांसाठी माझ्याकडून त्याने भाड्याने घेतला होता. मध्येच सोडला. पण अकरा महिन्यांचे भाडे त्याने ॲडव्हान्स दिले होते. तो कुठे नोकरी करतो, कुठला रहाणारा? मला त्याच्याशी काही घेणे-देणे नव्हते. मी ते विचारले पण नाही. मला भाडे मिळाले. बस झाले. मग त्याचे आई-वडील? ते त्याचे आई-वडील नव्हतेच. फक्त ओळखीचे होते. म्हणून त्याने फोन ठेऊन दिला. आता मुलीच्या वडिलांच्या लक्षात सर्व बनाव आला. ते घर, ते आई-वडील, ते फर्निचर सगळे भाड्याचे होते. फक्त आपल्याला फसविण्याकरिता. मुलीचे दागिने, आपले पैसे आणि मुख्य म्हणजे आपल्या मुलीचे तारुण्य आपल्यादेखत त्याने लुटून नेले. आपण हातोहात फसवलो गेलो. ते पण आपल्याच लोभामुळे. बरे त्या माणसाच्या ऑफीसचा, एखाद्या नातेवाईकाचा पत्तापण आपण मागितला नाही. केवढे आपण मूर्खपणे वागलो? आपल्या सुशिक्षितपणाचा काय उपयोग?**

पण आता सर्वकाही संपले होते. तो नराधम परत काही त्यांना भेटला नाही. तो खरोखरच दुबईला नोकरीला होता, का तो पण बनावच? काहीच समजण्यास मार्ग नव्हता. आपले नशीब! म्हणून हात चोळत बसण्याशिवाय गत्यंतर नव्हते. पण तो नराधम! त्याला काहीच कसे वाटले नाही? पैशांचे ठीक आहे. पण त्या तरुण मुलीच्या आयुष्याचा विध्वंस करतांना त्याला काहीच वाटले नाही! केवढा हा लोभ! केवढे हे क्रूरकर्म! पाप-पुण्याची चाड नाही. मृत्युनंतरच्या आयुष्याची त्याला

कल्पना नाही. हा सुशिक्षित दरोडेखोरच म्हटला पाहिजे. **मनुष्य हा किती चांगला असू शकतो! आणि किती क्रूर असू शकतो! ह्याची ही उदाहरणे बघितली म्हणजे, मनुष्याच्या कर्मबंधनाची गंमत वाटते. फक्त त्यातून आपण काहीतरी शिकले पाहिजे. ते व्यवहारात, कर्मात अगदी आध्यात्मात सुद्धा.**

## स्मरणशक्ती हरवून बसलेल्या आजोबांचे कर्मबंधन

साधारण इ. १९९० सालची गोष्ट. मी अंबरनाथच्या घरून एन. आर. सी. कंपनीत ड्यूटीवर जात येत होतो. कधी मोटरसायकलने तर कधी लोकल ट्रेनने. ड्यूटी साडेचारला संपायची. नंतर आंबिवली रेल्वे स्टेशनवरून कल्याणला यायचो. तेथून संध्याकाळी सव्वा पाचच्या लोकलने अंबरनाथला यायचो. गाडीला खूप गर्दी असायची. एक दिवस ड्यूटी संपल्यावर नेहमीप्रमाणे मी कल्याणला आलो. अंबरनाथ लोकलची वाट पहात होतो. गाडी पाच मिनीटातच येणार होती. तेवढ्यात माझ्या पाठीला कोणीतरी स्पर्श केला. मी मागे वळून पाहिले. तर एक म्हातारे गृहस्थ. वय साधारण ८० च्या आसपास. साऊथ इंडीयन वाटत होते. कमरेवर एक मळकी पांढरी लुंगी. फक्त गुढग्यापर्यंत. अंगात तशीच मळकी बंडी. हातात एक पिशवी. दाढी वाढलेली. चेहरा भोळा पण बावरलेला वाटत होता. हाताने खूण करत पुटपुटले. अंबरनाथ! अंबरनाथ! काय झाले कोणास ठाऊक? मला त्या गृहस्थांची दया आली. अगदी मनातून त्यांच्याबद्दल आपुलकी वाटली. मी विचारले, आपको अंबरनाथ जाना है? त्या वृद्ध गृहस्थांनी फक्त होकारार्थी मान हलवली. मुझे भी अंबरनाथ जाना है। चलो मेरे साथ।

तेवढ्यात गाडी आली. प्रचंड गर्दी होती. पण मला नेहमीची सवय

होती. त्या गृहस्थांचा हात धरून, सेकंड क्लासच्या डब्याच्या एका बाजूला उभा राहिलो. लोक उतरताच, त्यांना पुढे करून कसाबसा गाडीत चढलो. रेटारेटी करत जरा पुढे सरकलो आणि एका बाजूला उभा राहिलो. त्या गृहस्थांच्या चेहऱ्यावर थोडा आनंद झळकला. अगदी अंबरनाथपर्यंत गर्दी होती. बसता आलेच नाही. **सावकाश अंबरनाथ स्टेशनवर त्यांना उतरवले. विचारले, आपका घर कहाँ है? आधीच त्या गृहस्थांबद्दल मला करुणा निर्माण झाली होती. वाटले, यांना ॲटोरिक्षा करून घरी पोहचवावे. पण त्यांना काही सांगता येईना. गडबडून गेले.** उजव्या हाताचा अंगठा डोक्याला लावला आणि मग हलवला. खूण केली. काही आठवत नाही म्हणून. मी झटकन समजलो. ह्यांना स्मृतीभ्रंश झाला आहे. त्यांच्या निर्विकार चेहऱ्यावरून तसे वाटतच होते. व्यवस्थित बोलता पण येत नव्हते.

**आता मात्र मीच गडबडून गेलो. त्यांना घरी पोहोचविण्याची तीव्र इच्छा होती. पण करणार काय?** आजोबांना जवळच्या बाकावर बसवले. माझ्याजवळच्या बाटलीतले पाणी प्यायला दिले. आजूबाजूला कोणी ओळखीचे भेटते काय? म्हणून पाहू लागलो. यांना घेऊन पोलीस स्टेशनला जावे काय? असाही एक विचार मनात आला. तेवढ्यात आमच्या फॅक्टरीतले केमीकल प्लान्टमध्ये काम करणारे, एक साऊथ इंडीयन गृहस्थ पुढे आले. म्हणाले, भडंगसाब क्या हो गया? किसको ढुँडते हो? मला त्यांचे नाव आठवत नाही. मी इलेक्ट्रीकल डिपार्टमेंटला मेन्टेनन्स प्रमुख असल्याने, मला प्रत्येक प्लान्टला महत्त्वाच्या कामाला जावे लागे. म्हणून मला लोक ओळखत. पण मी सर्वांना नावाने ओळखत नव्हतो. पण चेहऱ्याने मात्र ओळखत असे. चार हजार लोक आमच्या फॅक्टरीत होते. मला एकदम हायसे वाटले. मी म्हटले, आप आगये। बहुत अच्छा हुआ! देखो तो, यह बुढे आदमीको । आपके जातवाला दिखता है। उनको अपना घरभी याद नही आता है। मेरे साथ कल्याणसे यहाँतक आये है। मी त्यांना त्या वृद्ध गृहस्थांकडे घेऊन गेलो. **ते निर्विकार**

**चेहऱ्याने बसले होते. त्या साऊथ इंडीयन गृहस्थांनी वृद्ध माणसाकडे निरखून पाहिले. एकदम म्हणाले, ये तो अपने रत्नमसाबके पिताजी है।**

मला एकदम हायसे वाटले. रत्नम केमीकल फ्लांटला सुपरीनटेंडेंट होते. मी त्यांना चांगला ओळखत होतो. पण घरगुती संबंध नव्हते. मी विचारले, आपको उनका घर मालूम है? त्यांनी होकार दिला. मला खूप आनंद झाला. माझ्या मनासारखे होणार. आजोबांना त्यांच्या घरी पोहचवता येणार. लगेचच आम्ही दोघेजण त्या आजोबांना रिक्षात घेऊन, रत्नमसाहेबांच्या घरी गेलो. घर पहिल्या मजल्यावर होते. आजोबांना हात धरून नेले. दारासमोर उभे राहिलो. बेल वाजवली. मी व आजोबा समोर होतो. ते गृहस्थ मागे उभे होते. **दार उघडले. समोर रत्नमसाहेब घरगुती वेशात उभे. त्यांनी मला ओळखले. एकदा माझ्याकडे, एकदा आजोबांकडे पहातच राहिले. त्यांच्या चेहऱ्यावर आश्चर्य उमटले. एकदम रडू लागले. म्हणाले, भडंगसाब आपतो भगवान हो। ये मेरे पिताजी। दो सालसे लापता है। अचानक घरसे निकल गये। इनकी यादगार खोगयी है। हम लोक इनको ढुँडते ढुँडते थक गये। बंबई, मद्रास सबजगह हमारे रिलेशनमे ढुँडा। मिले नही। हमने तो सब आशा छोड दी। आप तो इनका हात पकडकर मेरे घर मे ले आये। माझे दोन्ही हात हातात घेतले. आणि त्यांच्या कपाळाला लावले. त्यांच्या डोळ्यातले दोन पवित्र अश्रू माझ्या हातावर पडले. मला पण एकदम गहिवरून आले.**

मग आम्ही तिघे आत आलो. सोफ्यावर बसलो. आजोबांना व आम्हाला पाणी दिले. रत्नमसाहेबांनी आपल्या वडिलांना नमस्कार केला. मग त्यांच्या गळ्यात पडले. **पिता-पुत्रांचे मीलन पाहून मी धन्य झालो. हळूच माझे डोळे रूमालाने पुसले. रत्नमसाहेबांनी आमचा चांगला पाहुणचार केला. पण त्याच्या आधीच कृतज्ञतेचा पाहुणचार मिळाला होता.**

**मग मी विचार करू लागलो. काय ही परमेश्वराची अजब लीला! आजोबांना बघितल्याबरोबरच माझ्या मनात दया उत्पन्न झाली. घरापर्यंत पोहचवून देण्याची इच्छा झाली. जेव्हा अंबरनाथला उतरल्यावर आजोबांना घराचा पत्ता सांगता येईना. तेव्हा मी निराश झालो. पण भगवंताने माझ्या मदतीला, त्या साऊथ इंडीयन गृहस्थांना पाठविले. नाही तर मी काय केले असते? दोन वर्षे ते आजोबा खिशात पैसा नसतांना, कुठे राहिले असतील? काय खाल्ले असेल? कल्पनाच करवत नाही. आजोबांच्या पूर्व जन्मीच्या कर्माचे फळ म्हणून, त्यांना दोन वर्षांचा वनवास सहन करावा लागला. पण तो संपल्यानंतर त्यांना घरापर्यंत सोडण्यासाठी परमेश्वराने माझे माध्यम निवडले होते. त्यासाठी माझ्या मनात करुणा निर्माण केली. माझ्या मदतीला त्या साऊथ इंडीयन गृहस्थांना पाठविले. अशा तऱ्हेने बऱ्या-वाईट कर्माचे फळ तो परमेश्वर देणारच. त्यासाठी लागणाऱ्या आपल्यासारख्या माणसांचा तो अचूक उपयोग करून घेतो.**

असे हे प्रसंग. माझ्यासारखेच काही वाचकांनी पण त्यांच्या आयुष्यात अनुभवले असतील. त्यांनी स्वत: त्या प्रसंगांचा अर्थ लावून पहावा. मनुष्याच्या कर्मबंधनाशी नक्कीच त्याचा संबंध असेल.

## मनुष्याच्या अधोगतीचे कारण -लोभ

मनुष्याच्या आयुष्यातील लोभाची सुरवात अगदी बालपणापासून होते. मुलगा किंवा मुलगी, दीड-दोन वर्षांची झाली. थोडा समज येतो. मूल रांगायला लागते. चालायला लागते. निरनिराळ्या प्रकारची खेळणी त्याला आणली जातात. खाऊ दिला जातो. तो मुलगा खेळत बसतो. तेवढ्यात बाहेरचा त्याच्याच वयाचा मुलगा घरी आला की, लगेच

आपली खेळणी भरून ठेवतो. **त्या मुलाला एकही खेळणे घेऊ देत नाही. आपल्यातला खाऊ देत नाही. त्या न कळत्या वयातपण खेळण्यांचा, खाऊचा लोभ असतोच.** पुढे मोठा झाल्यावर तो वाढतो. लोभापाई कधी कधी शाळेतल्या मुलाच्या हातून चोरीपण होते. त्याकरिता चांगले आई-वडील त्याला शिक्षा करतात. लोभी पालकांना त्याचे काहीच वाटत नाही. **लोभ हा मनुष्याच्या मनात दडलेला असतो.**

मोठा झाल्यावर नोकरी-व्यवसाय करतो. लोभामुळे सन्मार्गाने मिळणारा पैसा कमी पडतो. मग त्यासाठी लाचलुचपत, लांडीलबाड्या वाढतच जातात. चांगले वळण, चांगली संगत असेल तर, माणूस लोभापासून स्वत:चा बचाव करू शकतो. पुढच्या आयुष्यात स्त्रीचा लोभ. त्यासाठी परत पैसा. अनेक स्त्रीया. अनिती. हे सगळे वाढतच जाते. **संतोष हाच माणसाला लोभापासून परावृत्त करतो. त्याला नीतिमत्ता शिकवतो. लोभ अनेक प्रकारचे असतात. पण प्रत्येक गोष्टीत आहे त्यात संतोष मानणे, हेच श्रेयस्कर. त्यासाठी माणसाने महत्त्वाकांक्षी नसावे, असे नाही. पण सर्व प्रयत्न नीतिच्या मार्गाने असावेत. अनीतिला त्यासाठी जवळ करू नये.**

सम्राट सिकंदराचा शेवट जवळ आला होता. त्यावेळेस त्याला थोडीफार ज्ञानप्राप्ती झाली होती. त्याने आपल्या पुर्वायुष्याचे अवलोकन केले. तेव्हा त्याला उपरती झाली. लोभाच्या अतिरेकापाई आपण काय केले? हे तो समजून चुकला. त्याने आपल्या वजीरांना सांगितले. आता लवकरच मी मरणार आहे. मी मेल्यानंतर माझा देह, सुंदर अशा कबरीत दफन करा. पण माझे दोन्ही हात मात्र कबरीच्या वरच राहू द्या. **सर्व लोकांना समजू द्या. ज्या सिकंदराने लोभापाई आपल्या आयुष्यात हजारो, लाखो माणसांची कत्तल केली, अमाप संपत्ती मिळवली, आपले खजिने प्रचंड अशा हिरे, मोती, सोने-चांदी यांनी भरले. तो सिकंदर पण ह्या दुनियेतून जातांना खाली हात गेला. बरोबर एखादी सुईपण नेऊ शकला नाही.**

**जर आपल्याला रिकामेच यायचे आहे आणि रिकामेच जायचे आहे! तर लोभ कशासाठी?**

## सद्गुरूंची माझ्यावर असलेली कृपा

**माझे सद्गुरू प. पू. रामकृष्ण महाराज. स. स. नरसिंहेश्वर महाराजांचे परमशिष्य.** हिंचेगिरीच्या स. स. भाऊसाहेब महाराजांनी वृद्धींगत केलेला स्वरूप संपद्राय. कर्नाटकातील जमखंडी जवळचे छोटेसे गाव यल्लट्टी. तेथे स. स. नरसिंहेश्वर महाराजांचे समाधीमंदिर. तसेच प. पू. रामकृष्ण महाराजांचा आध्यात्मआश्रम. तेथे आमच्या सद्गुरूंचे वास्तव्य. इ. स. १९८७ सालीच त्यांनी मला गुरूमंत्र दिला. तो माझ्या वयाच्या अडतिसाव्या वर्षी. मी एन. आर. सी. च्या नोकरीत असतांना गुरूमंत्राचा जप, साधना जमेल तशी करायचो. नेहमीच महाराजांची आठवण असायची. नोकरीच्या काळातला एक प्रसंग आठवला.

मी इलेक्ट्रीकल इंजिनीयर म्हणून हाय टेन्शन सब स्टेशन मध्ये काम करायचो. २२००० व्होल्ट पर्यंतची उपकरणे मला हाताळावी लागत. आपला घरातील विद्युत सप्लाय फक्त २३० व्होल्टचा असतो. **मी खातेप्रमुख होतो. रोजची कामे खूप जबाबदारीची आणि धोक्याची. प. पू. रामकृष्ण महाराजांची आठवण कायम असायची. प्रामाणिकपणे आणि सुरक्षित काम. कुठलाही कामचुकारपणा किंवा कंपनीचे नुकसान, ह्यापासून चार हात दूर असायचो. सद्गुरूंची शिकवणच तशी होती.**

एक दिवस सब स्टेशनमधील ३३०० व्होल्टच्या एका सर्कीट ब्रेकरमध्ये बिघाड झाला. तो जर्मनी येथील सिमेन्स कंपनीचा अवाढव्य आकाराचा सर्कीट ब्रेकर. पॅनलच्या बाहेर काढण्यास पण बराच वेळ

लागला. युक्तीने आणि ८-१० माणसांच्या मदतीने तो बाहेर काढला. रिपेअर करण्यास चार दिवस लागले. सगळे काम माझ्या देखरेखी खाली चालले होते. शेवटी रिपेअर झाल्यानंतर त्याला सर्व्हीसमध्ये घ्यायचे होते. मला एक अर्जंट मिटींग होती. म्हणून ते काम असिस्टंटवर सोपवले आणि मी गेलो. परत आल्यानंतर त्या पॅनलजवळ गेलो. तो सर्कीट ब्रेकर पॅनलच्या आत टाकलेला होता. वेळ झाल्यामुळे असिस्टंट निघून गेला होता. मी त्या सर्कीट ब्रेकरचे शटर उघडून बघावे. ह्या विचारात होतो. माझे बाजूला एम. एस. ई. बी. मधील डेप्युटी इंजिनीयर असणारे, माझे मित्र होते. मी शटरला हात लावला आणि शटर वर केले. ते डायरेक्ट सर्कीट ब्रेकरच्या आतल्या लाईव्ह पार्टवर आदळले. **एकदम मोठ्ठा स्पार्क झाला. क्षणभर आगीचे लोळ बाहेर आले. आणि सर्व शांत झाले. शॉर्ट सर्कीट झाले होते आणि प्रोटेक्शन सर्कीट ऑपरेट होऊन पॅनलचा सप्लाय डिसकनेक्ट झाला होता. शटर वर करून माझे हात झटकन बाजूला झाले होते. अन्यथा त्या शॉर्ट सर्कीटमध्ये मी सापडून माझा देह काळाठिक्कर पडला असता. त्याच क्षणी माझा मृत्यु झाला असता.** एवढी शक्ती त्या ३३०० व्होल्टच्या शॉर्ट सर्कीटमध्ये होती. आगीच्या गरम झळा मला लागल्या. पण चेहऱ्यावर, हातावर कुठेही भाजले नाही. माझे इंजिनीयर मित्रपण झटकन मागे झाले.

माझे डोके सुन्न झाले. पण त्याही परिस्थितीत कर्तव्य माझ्या डोळ्यासमोर होते. त्या पॅनलवर असणाऱ्या केमीकल प्लँटचा सप्लाय, मी दुसऱ्या पॅनलवरून चालू केला. दुसऱ्या दिवशी सर्व चेकींग केले असता, माझ्या लक्षात आले. त्या शटरच्या ऑपरेटींग मधील इंटरलॉकचा पार्टच माझ्या असिस्टंटने लावला नव्हता. त्यामुळे ते शटर नेहमीप्रमाणे अर्ध्यावर न थांबता पूर्ण आत जाऊन, लाईव्ह पार्टवर (चालू असलेल्या पार्टवर ) आदळून शॉर्ट सर्कीट झाले होते. चूक माझी नव्हती. पण माझ्यावर भोगण्याची पाळी आली होती. सद्गुरूंनी माझे हात वेळीच

बाजूला करून मला वाचविले होते. माझा प्रामाणिकपणा, कामातील शुद्ध हेतू आणि भक्तियुक्त साधना. यामुळेच परमेश्वराने सद्‌गुरू रूपाने माझ्यावर कृपा केली. हे निश्चित.

सबंध चाळीस वर्षांच्या नोकरीत असे काही जीवघेणे प्रसंग माझ्या आयुष्यात आले. **पण सद्‌गुरू कृपेचा वरदहस्त माझ्यावर होता. त्यामुळे प्रत्येक प्रसंगातून मी तरलो. साधा भाजण्याचा डागपण माझ्या शरीरावर पडला नाही. हे लिहीत असतांना माझे सद्‌गुरू प. पू. रामकृष्ण महाराजांची करुणामय मूर्ती माझ्या डोळ्यासमोर उभी आहे. नक्कीच गत जन्मीच्या कर्माचा यात संबंध आहे. काळ आला होता. पण महाराजांनी वेळ येऊ दिली नाही. नाहीतर हे सर्व लिहिण्यास मी जीवंतच राहिलो नसतो.**

## मानवी जीवनाचा गोड शेवट महत्त्वाचा

**मानवी जीवनाचा शेवट गोड व्हावा म्हणून मोठ मोठे साधु-संत, आत्मज्ञानी पुरुष, योगी सर्वच जण प्रयत्नशील असतात. मृत्युच्या शेवटच्या घटकेला देवाचे, गुरूचे स्मरण झाले पाहिजे. त्याचे नाव मुखात आले पाहिजे. त्यासाठी जन्मभर त्याचे नामस्मरण. तेही भक्तिभावाने. कुठल्याही विषयाची, संसारिक सुखाची अभिलाषा न धरता. फक्त देवाकरताच त्याचे नाव. तो मिळावा म्हणून. आत्मा हा परमात्म्याचे मायेच्या आरशातले प्रतिबिंब. सर्व जग, सृष्टी, चौऱ्यांशी लक्ष योनीतील जीवसृष्टीचा खेळ, हे सर्व भगवती मायेमुळे. ते पण परमात्म्याचे मूळ स्वरूप असलेल्या निर्गुण-निराकार ब्रह्माचे इच्छेमुळे. मायेचा हा खेळ कर्मगतीच्या आधाराने चालतो. हा कर्मगतीचा खेळ मोठमोठ्या आध्यात्मातील बुजूर्गांनापण चकवा देतो. मन हे आरशासारखे**

**स्वच्छ पाहिजे. मरणाचे समयी मनात कुठलीच इच्छा, वासना नको. कोणाबद्दल राग, द्वेष नको. त्याचे अकल्याण होण्याची इच्छा नको. एवढेच नाही तर, जवळच्या आप्तेष्टांचे प्रेम, त्यांचे कल्याणाची इच्छा पण नको. मरतांना चांगल्या-वाईट दोन्ही प्रकारच्या वासना, ह्या मोक्षाच्या प्राप्तीसाठी अडसरच आहेत. चांगल्या वासना पूर्ण करण्यासाठी भगवंत परत मनुष्य जन्म देतो. वाईट वासना असणाऱ्यांना अधोगती ठरलेलीच आहे. ह्याबाबतीत परमेश्वर कर्तव्य-कठोर आहे.**

**हे सर्व फार कठीण आहे. जन्म-जन्मांतरीचे पुण्य आणि इश्वराच्या करुणेचा लाभ, ह्या दोघांची आवश्यकता आहे. तरच मानवी जीवनाचा शेवट गोड होतो. यातनारहित सुंदर मृत्युचे भाग्य लाभते.** गुरूपदाला पोहचलेल्या आध्यात्मिक उन्नत पुरुषांनापण भक्त कल्याणाची इच्छा, आश्रमाची काळजी ह्या गोष्टी मारक ठरतात. त्याच कल्याणकारी कामासाठी त्यांना पुनर्जन्म घ्यावा लागतो. परमार्थातला प्रपंच हा तर फारच वाईट. अधोगती ठरलेलीच. प्रपंचात राहून शुद्ध परमार्थ करणारे भक्तजन, कासवाच्या गतीने का होईना? पण काही जन्मांतराने जीवन-मृत्युच्या फेऱ्यातून आपली सुटका करून घेतात. काही लोक मृत्युसमयी व्याधीग्रस्त असतात. देहदु:खाने त्रस्त झाल्याने मन अस्थिर असते. दवाखान्यात औषधोपचारांनी ग्लानी आलेली असते. ह्या सर्व परिस्थितीत देवाची आठवण होणे शक्यच नसते. एखादाच पुण्यात्मा अशाही परिस्थितीत यमदूत समोर दिसल्यावर, आपल्या इष्टदेवतेचे, सद्गुरूंचे स्मरण करतो. कधी ते बाजूच्या लोकांना जाणवते. कधी जाणवतही नाही. पण मृत्युसमयी अशा भाग्यवंतांचा चेहरा प्रसन्न आणि शांत असतो.

# शेवटचा दिवस गोड करणारे पुण्यवान महात्मे

**काही महात्म्यांना, योगी पुरुषांना आपला निर्वाणाचा क्षण माहीत असतो. ते काही दिवस आधीच तसा संकेत आपल्या भक्तांना देतात. त्या अतिशय गोड अशा क्षणाची तयारी आधीच झालेली असते.** अगदी पद्मासनात ध्यानस्थ बसून, पंचप्राण ब्रह्मरंध्रात केंद्रीत करून, हळूच परमात्म तत्त्वात विलीन होतात. आमच्या सद्गुरूंचे सद्गुरू प. पू. नरसिंहेश्वर महाराज. त्यांनी आपल्या महानिर्वाणाचा स्पष्ट संकेत चार दिवस आधीच, भर सभेत केलेल्या प्रवचनात आपल्या भक्तांना दिला होता. त्याप्रमाणे अधिक श्रावण शु. पौर्णिमा, शके १८६९ (दि. १-८-१९४७) रोजी दुपारी दोनच्या सुमारास ध्यानस्थ बसले व आपला पुण्यात्मा ब्रह्मरंध्रातून परमात्म तत्त्वात विलीन केला. प्रसिद्ध कीर्तनकार प. पू. निजामपूरकर महाराजांनी कीर्तन करता करताच आपल्या देहाचे विसर्जन केले. असे पुण्यात्मे विरळच. पण अशी उदाहरणे साधु-संतांच्या भारत भूमीत घडलेली आहेत व अजूनही घडतील. कलियुगात भगवान श्रीकृष्णाचे तसे वरदानच आहे.

संत कबीर. एक अलौकिक व्यक्तिमत्त्व. रामनामाचे उपासक. त्यांचे गुरू प. पू. रामानंद. मोठे विद्वान शास्त्रसंपन्न दशग्रंथी ब्राह्मण. कबीरांना साधक अवस्थेत रामानंदांकडून नामबोध घेण्याची तीव्र इच्छा झाली. पण ते आपणास नाम देणार नाहीत, याची खात्री होती. रोज रामानंद भल्या पहाटे गंगातीरावर स्नान करण्यास जात. त्यांचा मार्ग कबीरांनी बघून ठेवला. एकदा पहाटेस रामानंद स्नानाला जाण्याच्या अगोदरच ते एका पायरीवर आडवे झोपून राहिले. सर्वत्र अंधार होता. साहजिकच आचार्यांनी कबीर झोपलेल्या पायरीवर पाय ठेवताच. ते अडखळले. तोंडातून 'राम राम' असा सहज शब्दोच्चार झाला. कबीर

उठले. त्यांनी रामानंदांना नमस्कार केला. गुरुमुखातून निघालेल्या रामनामाचा अखंड जप केला. स्वत:चा उद्धार करून घेतला. कबीर रामानंदांचे एकनिष्ठ शिष्य झाले. त्यांनी आत्मज्ञान प्राप्ती करून घेतली.

प. पू. रामानंदांचा शेवट जवळ आला. त्यांनी आपल्या शिष्यांना जवळ बोलावले. म्हणाले, मी आता देह ठेवणार. प्राण देहातून बाहेर पडल्यावर, मी आत्मरूपाने स्वर्गात जाईन. तेथे पोहचल्यावर माझ्या स्वागतार्थ, स्वर्गातील घंटा वाजेल. तिचा मंजुळ ध्वनी तुम्हा सर्वांना ऐकू येईल. त्यानंतरच तुम्ही माझ्या पार्थिव देहाला अग्नी द्या. असे म्हणून ते ध्यानाला बसले. समोरच एक पेरूचे झाड होते. पिवळसर गुलाबी रंगाचा, पूर्ण पिकलेला पेरू त्यांना दिसला. क्षणभर तो खाण्याची इच्छा झाली. पण देह त्यागाचा संकल्प केलेला होता. त्याप्रमाणे त्याच क्षणी आत्मा देहापासून वेगळा झाला. मोठे आत्मज्ञानी संत. क्षणभराची क्षुल्लक वासना. अंतिम समयी तिनेच घोटाळा केला. कुठला स्वर्ग! अन् कुठली मुक्ती! त्या पिकलेल्या पेरूच्या आत अळी म्हणून जन्म घेतला. इकडे आश्रमात सगळे शिष्य, सद्‌गुरूंनी सांगितल्या प्रमाणे स्वर्गातील घंटानादाची वाट पहात होते.

तासभर झाला. कोणालाच घंटा-नाद ऐकू आला नाही. सर्व शिष्यांनी एकमेकाला विचारले. सर्वांचा तोच अनुभव. सर्व शिष्यात आत्मज्ञानाप्रत पोहचलेले, संत कबीरच. सगळ्यांनी कबीरांना विनंती केली. काय झाले ते पहा म्हणून. गुरू आज्ञेप्रमाणे घंटा-नाद ऐकल्याशिवाय पार्थिवाचे अग्नीसंस्कार करता येणार नव्हते. कबीर ध्यानाला बसले. ध्यानात समोरच्या झाडावरचा पिकलेला पेरू दिसला. पेरूतल्या अळीत पुनर्जन्म पावलेले सद्‌गुरू दिसले. कबीर आत्मज्ञानीच. ते सर्व प्रकार उमगले. झाडावरचा पेरू तोडून आणला. तो कापला. त्यातून तासभरातच वाढलेली मोठी अळी बाहेर आली.

तिला कबीरांनी आपल्या डाव्या हाताच्या तळव्यावर घेतले. सद्गुरूंना नमस्कार केला आणि उजव्या हाताच्या बोटाने तिला मुक्ती दिली. दोन मिनीटानंतर स्वर्गातील घंटेचा मंजुळ ध्वनी स्पष्टपणे सगळ्या शिष्यांच्या कानात निनादू लागला. रामानंदांच्या स्वर्गारोहणाची खात्री पटली. मगच त्यांच्या पार्थिव देहाचे अग्नीसंस्कार करण्यात आले.

**पहा. एवढे मोठे महात्मा. पण कर्मगती. ती कोणालाच चुकविता येत नाही. प्रारब्धकर्म संपले नसेल. तासभराचाच अळीचा जन्म. त्यातले क्लेश भोगायचे बाकी असतील. ते भोगूनच सद्गती मिळाली. तेवढ्या करताच ती अंतीम क्षणी मनात आलेली पेरूची वासना. कसा हा परमेश्वर! एवढी छोटीसी गोष्ट विसरला नाही. त्याच्या महान भक्ताला पण कर्माचे फळ दिलेच. तर आपल्यासारख्या सामान्य माणसाचे काय? विचार करावा तेवढा कमीच. पूर्वजन्माच्या कर्माचे आपल्याला माहीत नाही. पण त्याचे कर्मबंधन ह्या जन्मात आहेच. आपली उत्क्रांती करून घ्यायची असेल तर, पुढील जन्मासाठीचे कर्मबंधन सैल केले पाहिजे. त्यासाठी ह्या जन्मीच न्याय नीतिने वागले पाहिजे. सगळ्यांना प्रेम दिले पाहिजे. सृष्टीचा अफाट पसारा न्याय-नीतिने चालवणाऱ्या भगवंताची भक्ती केली पाहिजे. तीपण निष्काम भावनेने. सत्कर्म करायचे. पण फळाची इच्छा न धरता. परमेश्वराचे काम परमेश्वर करेल. आपण आपले काम आनंदाने करायचे. मग बघा, जीवन कसे आनंदी होते ते! प्रारब्ध संपल्यावर अधिक उन्नतीसाठी तुमचा पुनर्जन्म असेल. तो पण मानव जन्मात. आणि त्यासाठी यातनारहित सुंदर मृत्यु, तुमची ह्या जन्मातून सुटका करील.**

# शेवटच्या दिवसासाठी संत सूरदासांची श्रीकृष्णाला आळवणी

**भगवान श्रीकृष्ण हा विष्णूचा पूर्णावतार मानला जातो. मानव जन्मात असून पण आपण भगवंत आहोत, याची त्यांना पूर्ण स्मृती होती.** त्या अवतारातील त्यांच्या लीला अगाध होत्या. अगदी बाल अवस्थेपासून त्यांच्या प्रचंड शक्तीचा अनुभव येत होता. धर्मस्थापनेसाठीचा अवतार. श्रीकृष्णाच्या लीलांचे वर्णन अनेक ऋषिमुनींनी केले आहे. ते वाचून, ऐकून भक्तांचे अष्टसात्विक भाव जागृत होतात. प्रेम, शौर्य, ज्ञान, नीति काय नाही त्यात? **राधा आणि गवळणींचे अलौकिक असे विषय-वासनारहित प्रेम. देव आणि भक्तातले अंतर नाहीसे करणारे. भक्तीची परिसीमा गाठणारे.** सत्य युगात बऱ्याच ऋषि-मुनींनी भगवंताची भक्ती केली. आराधना केली. पण त्यांना भगवत्‌भक्तीचा आनंद मिळाला नाही. त्यासाठी त्यांनी भगवान विष्णूची प्रार्थना केली. भगवान विष्णूंनी त्यांची इच्छा श्रीकृष्ण अवतारात पूर्ण करण्याचे आश्वासन दिले. त्याप्रमाणे ऋषि-मुनींनी गवळणींचा जन्म घेतला. भगवत् प्रेमाच्या आनंदाने त्यांचे रोम रोम नाहून निघाले. पुढे कलियुगात तशीच भक्तीची परिसीमा संत मीराबाई सारख्या अनेक भक्तांनी गाठली. त्यातलेच एक संत सूरदास.

**संत सूरदास हे बालपणापासूनच दोन्ही डोळ्यांनी आंधळे. पण श्रीकृष्णाचे प्रेम त्यांच्या रोमा रोमात भिनले होते. त्यांची भक्ती डोळसांच्याही डोळ्यात अंजन घालणारी.** अनेक भक्तिपर रचना त्यांनी केल्या आहेत. त्या अप्रतिम आहेत. कृष्ण भक्तीचे अनुपम असे उत्कट दर्शन त्यातून जाणवते. चोवीस तास कृष्ण-कन्हैयाचा ध्यास. श्वासा श्वासात त्याचे नाव. **एवढे असूनही शेवटच्या दिवसाचे महत्त्व त्यांना कळले होते.** त्यासाठी त्यांचे कृष्णाला आळवणी करणारे गीत मनाला

वेधून जाते. आपल्याला अंतर्मुख करते. त्याचा भावार्थ खालील प्रमाणे.

**हे श्रीकृष्णा, हे कन्हैया तू किती दयाळू आहेस. गोपींच्या हृदयात तुझे प्रेम जागृत करून, तुझ्या अतिमधुर अशा बासरीच्या स्वराने त्यांना वेडे केलेस. तुझ्यावरच्या अशरीरी अशा निस्वार्थ प्रेमाने त्यांना भवसागरातून पार केलेस. द्रौपदीच्या आर्त हाकेला साद दिलीस. त्याचक्षणी अदृश्य रूपाने तिच्याजवळ येऊन तिचे लज्जारक्षण केलेस. तुझ्या अतिप्रिय अशा मित्राला, अर्जुनाला गीतेचा उपदेश केलास. त्याच्याकरवी धर्मयुद्धात कौरवांचा म्हणजे दृष्टांचा नाश करवून पृथ्वीचा भार हलका केलास. शेवटी त्याला तुझ्या स्वरूपात विलीन करून घेतलेस. प्रिय सखा अर्जुनाला केलेला भगवत्‌गीतेचा उपदेश हे एक निमित्तच. खरे म्हणजे पुढे येणाऱ्या कलियुगातील मानवाला दिलेली, ती संजीवनीच. आमच्या सारखे पापी लोक, तिचे प्राशन करून कलिच्या प्रभावातून दूर होतात. तुझे नाम अखंड जपतात. कर्माच्या बंधनातून मुक्त होण्याचा प्रयत्न करतात.**

**तरी हे दयाळू कन्हैया, तुझे बालरूप किती सुंदर. ते माझ्या डोळ्यासमोर उभे रहाताच, माझे अंग अंग पुलकित होते. दोन्ही डोळ्यातून अश्रू पाझरू लागतात. मन आनंदाने भरून जाते. ते सावळे सुंदर रूप. पिवळा पितांबर. मुखावर विलसणारे निरागस हास्य. गळ्यात टपोऱ्या मोत्यांची माळ. उजव्या हाताने ओठावर धरलेली तीरकस बासरी. डाव्या हाताने अलगद पेलून, हळूवार बोटांच्या हालचालीने नियंत्रित करणारे, ते अतिमधुर असे लोभस सूर. असे रुप पहाताच माझे नयन पाझरू लागतात. ते आनंदाश्रू पुसण्याचेही भान माझ्या हातांना रहात नाही. दृष्टी तर त्या रूपावरून बाजूलाच होत नाही. मनाची प्रसन्नता हृदयाच्या आत खोलवर जाऊन, तेथेच स्थिर होते. त्यावेळेस माझ्यातला मी हरवतो. त्याचक्षणी तुझ्याशी एकरूप व्हावेसे वाटते. पण तुला**

**कोठे माझी दया येते! तुझे ते लोभस, मनभावन रूप माझ्या डोळ्यासमोरून दूर होते. मग मागे उरतात, ते विरहाचे अश्रू. मग मी भानावर येतो. पण ते विरहाचे पवित्र अश्रू पुसून टाकायला मन होत नाही. तेच अश्रू तुला अंतिमसमयी माझ्याजवळ येण्यास भाग पाडतील. मग मी समजतो. अजून ती वेळ आली नाही. तो अंतिम दिवस, ती अंतिम वेळ तुलाच माहीत आहे. मी त्यावेळेस कोठेही असलो! कसाही असलो! तरी तू धावत ये. असाच बालरूपाने बासरी वाजवत माझ्या डोळ्यासमोर उभा रहा. त्या अतिमधुर अश्या स्वराने माझे विषयात रमलेले, भटकत असलेले मन ताळ्यावर येईल. तुझ्या रूपाशी तल्लीन होईल. मन आनंदाने डोलायला लागेल. त्याचवेळेस यमदूत येतील. पण तू समोर असल्याने, त्यांना माझे प्राण हरण करून यमलोकी नेण्याचे धाडस होणार नाही. मग तूच माझे प्राण, माझ्या देहातून अलगद वेगळे कर. त्या प्राणाला तुझ्यात सामावून घे. जन्मजन्मांतरीचा तुझा-माझा विरह, वेगळेपण नाहीसे होईल. मी रहाणारच नाही. मग तुझ्यात सामावलेले माझे मन, माझ्या पार्थिव देहाकडे पाहील. पण त्याला तू तेथे अडकवू नकोस. पटकन तुझ्याबरोबर वैकुंठाला घेऊन जा आणि पूर्णपणे त्याला तुझ्यात विलीन कर.**

## मानवी कठपुतळीचा विलक्षण खेळ

**असा हा जन्म-मृत्युचा विलक्षण खेळ. कठपुतळीच्या खेळासारखा परावलंबी.** कठपुतळीला नाचवणारा एक मानवी कलाकार. पोटासाठी चार पैसे कमावणारा. तो पण आपल्या हातातली दोरी किती कुशलतेने हाताळतो? कठपुतळीचे सुंदर सुंदर नाच लोकांना

दाखवतो. त्यांना मंत्रमुग्ध करतो. खेळ पहाणारे खूश होतात. दोन-चार पैसे फेकतात. ते उचलून खेळ करणारा आपले पोट भरतो. बिचारी कठपुतळी. कापडाची निर्जीव बाहुली. मालक तिला नवीन नवीन कपडे शिवतो. आकर्षक दिसावी म्हणून. त्याचे तिला न सुख, ना दु:ख! ती कधी दमत नाही.

पण माणसाचे काय? हा जन्म-मृत्युचा खेळ, तो कठपुतळीसारखाच खेळतो. विषयसुखात आनंद मानतो. त्यासाठी झगडतो. स्वार्थाने प्रेरित होऊन बरी-वाईट कर्मे करतो. स्वत:ला सुख मिळविण्यासाठी इतरांना काय त्रास होईल? याचा विचार करीत नाही. काम-क्रोध मागे लागतात. **नरजन्म देणाऱ्या ईश्वराला विसरतो. आपल्या जीवनरथाची दोरी ईश्वराच्या हातात आहे. हेच तो विसरतो.** कर्मबंधनातून सुटण्यासाठी, आपल्या उन्नतीसाठी हा जन्म आपल्याला ईश्वराने दिला आहे, ह्याची आठवण रहात नाही. उतार वयात शरीर व्याधीग्रस्त होते. पैसा हेच दैवत मानणारा मानव, लक्ष्मी निघून गेल्याने दु:खी होतो. मृत्युचा समय जवळ येतो. मग देवाची आठवण होते. पण वेळ निघून गेलेली असते. ह्या जन्म-मृत्युच्या खेळातून सुटका होत नाही. **मानवरूपी कठपुतळीचा मालक ईश्वर. तो ह्या खेळाची सूत्रे स्वत:च्या मर्जीनुसार हलवत नाही. तर ती मानवाच्या जन्मोजन्मीच्या कर्माप्रमाणे हलवतो. तेही अगदी शिस्तबद्ध रितीने. मानवी जीवनातल्या अगम्य अशा सुख-दु:खांचा विचार केला, तर ईश्वर हा त्याचे मर्जीनुसार सूत्र संचालन करतो, असे वाटते. पण ती आपल्याच कर्माची फळे असतात. आपल्याला ते उमगत नाही.** आपण ईश्वरालाच दोषी ठरवतो. संत-महात्मे हे सर्व जाणतात. आपल्याला शरण आलेल्या भक्तांना, ही ईश्वराची नीति समजावून सांगतात. त्याला प्रगती पथावर नेतात. त्याचे कर्मबंधन कमी करतात. म्हणूनच मानवाने संत-महात्म्यांचा संग करणे आवश्यक आहे.

# सुलभाचा अनोखा मृत्यु

सुलभा. माझी प्रिय पत्नी. अतिशय सुंदर, गोरीपान. पण भोळी. विलक्षण निळसर डोळे. वात्सल्याने पुरेपूर भरलेले. सुना-नातवंडात रमलेली. मैत्रीणीत दंगलेली. नवऱ्याबरोबर मुलांची आणि इतर नातेवाईकांची काळजी घेणारी. नवीन नवीन पदार्थ करून सगळ्यांना खाऊ घालण्याची नैसर्गिक आवड. घराची अन्नपूर्णा. हाताला विलक्षण चव. **भजनाची खूपच आवड. कुठेही गेली, तरी भजनाची वही जवळ असायची. प्रसंगानुरूप एखादे भजन, एखादे गाणे तरी म्हणायची. रूपासारखाच आवाजाला गोडवा होता.** भजनी मंडळात पुढाकार घेऊन नवीन नवीन भजने, नवीन नवीन चाली बायकांना शिकवायची. नटायची स्त्रीसुलभ आवड. खूप साऱ्या अनेक रंगांच्या साड्या. नेसल्यावर तिचे रूप खुलायचे, की साड्यांचे? प्रश्नच पडायचा! मॅचींगची आवड. तरीपण ह्या सर्वात गुंतलेली कधी दिसली नाही. वयाची साठी संपत आली होती. **रात्री मध्येच उठायची. माळ घेऊन जप करीत बसायची. मला अधे-मधे जाग आली तर, मी म्हणायचो. अग दिवसभर एवढी दमतेस. रात्री जरा शांत झोप. अहो, दिवसभर नातवंडे कुठे जप करू देतात? जप झाला नाही की, मन बेचैन होते. आमच्या घराचे सद्‌गुरू एकच. प. पू. रामकृष्ण महाराज. त्यांचेकडून पंचवीस वर्षांपूर्वी नाम घेतलेले. योगाचे शिक्षण घेतलेले. वेळात वेळ काढून सुलभ आसने आणि प्राणायाम करायची. एकंदर लोभस व्यक्तिमत्त्व.** हरहुन्नरी स्वभाव. बसमध्ये, गाडीमध्ये, नातेवाईकांचा-मित्रमंडळींचा एकत्र प्रवास असला की, सुरवातीला भजने म्हणायची. गाण्यांच्या भेंड्या खेळण्याची भारी हौस. बायका, मुले, मुली यांचे दोन गट पडायचे. मुला-मुलींचा भर नवीन सिनेमाच्या गाण्यांवर. तर बायकांचा भर जुन्या गाण्यांवर. पुरुष फक्त

कान टवकारून गाणी ऐकायचे. मीही त्यातलाच. हिला मात्र जुन्या हिंदी-मराठी गाण्यांची खूप आवड. भेंड्यांमध्ये कधी हार मानायची नाही. कितीतरी गाणी हिला सुचत. सोबत भजने होतीच. मला वाटायचे, रोज तर हिचे बोलणे कमी. कधीच वायफळ बडबड करीत नसे. मग हिला हे सुचते तरी कसे? **काय हिच्या मनात दडले आहे? काही कळत नाही.** आम्ही दोघेच प्रवास करीत असलो की, मीच बोलायचो. ही फक्त मध्येच काहीतरी अर्थपूर्ण बोलायची. **एकंदरीत अबोल पण प्रसंगानुरूप खुलण्याचा स्वभाव. त्यामुळे सहवास कधी कंटाळवाणा वाटलाच नाही. सदतीस वर्षांचा सहवास. मोठा कधी वाटलाच नाही. भुरकन उडून गेला.**

दिनांक २० डिसेंबर २०१२ ची मध्यरात्र उलटली. मी झोपेतच होतो. मोठा मुलगा मयुरेश रात्री साडे अकरा वाजता ऑफीसमधून आला होता. त्यानंतर आम्ही झोपलो. रात्री झोपायला उशीर. सकाळी लवकर उठायचे. पण कधी कुरबूर नाही. त्या रात्रीपण सुलभा शांत चित्ताने झोपली होती. कुठलीच शारीरीक तक्रार नव्हती. मला मध्येच जाग आली. बाजुला पाहिले तर सुलभा बेडवर मांडी घालून बसलेली. घड्याळात पाहिले, पहाटेचे साडे तीन वाजले होते. मी म्हटले, सुलभा काय झाले? अजून तर फक्त साडेतीन वाजताहेत. दोन चार दिवसांपासून थंडी चांगली पडली होती. म्हणाली, जरा अस्वस्थ वाटते. थंडी पडली आहे. सर्दीचा त्रास होतो का? तर हो म्हणाली. मी म्हटले, चल स्वयंपाकघरात. व्हीक्स घालून वाफ देतो. मी पुढे गेलो. वाफेचे विजेवर चालणारे भांडे काढले. पाणी भरले. व्हीक्सची कॅपसूल त्यात टाकली. किचनच्या ओट्याशेजारीच मार्बलचे देवघर आहे. समोरच्या लाकडी बसक्या स्टूलावर वाफेचे भांडे ठेवले. विजेचे बटन चालू केले. तेवढ्यात सुलभा आपणहून किचनमधे येऊन खूर्चीवर बसली होती. नेहमी सारखीच शांत. दहा मिनिटानंतर काय घडणार आहे? तिलाच कल्पना नव्हती, तर मला कशी असणार?

दोन मिनीटातच भांड्यातून वाफ यायला सुरवात झाली. सुलभा मांडी घालून देवासमोर बसली. टॉवेल डोक्यावर घेऊन स्टूलावरच्या भांड्यातून निघालेली वाफ, तोंडावाटे, नाकाद्वारे आत घेऊ लागली. मी बेल वाजवून मुलांना बोलावले. दोन्ही मुलगे, मोठा मयुरेश व धाकटा पुष्कर. पहिल्या मजल्यावर झोपतात. आम्ही सर्वजण एकत्रच राहतो. खालच्या मजल्यावर दोन बेडरूम. आईची एक खोली व आमची एक खोली. बाजूलाच भावाची फॅमीली. दोन्ही मुले, सुना सौ. स्नेहल व सौ. विद्या चौघेही झटकन खाली आले. मी सुलभाच्या सांगण्यावरून पिण्यासाठी गरम पाणी करत होतो. काय गडबड! म्हणून आई, भावाची सून सगळेच आले. सुलभा अर्धा ग्लास गरम पाणी प्यायली. दोन्ही सुना बाजूलाच बसल्या. **सासूला सांभाळायला. धीर द्यायला. सासू काय! ती त्यांची आईच होती. नवीन घरात आल्यावर त्यांचे सासू-सूनेचे नाते संपले होते. इतकी त्यांची सासू प्रेमळ होती.**

**तेवढ्यात अचानक सुलभाच्या मनात काय आले? कोण जाणे? मयुरेशला म्हणाली, मला देवाचा अंगारा लाव. चेहरा शांत होता. पहाटेची वेळ. देवासमोर बसलेली. थोडा श्वास घ्यायला त्रास होऊ लागला. पण आतून काही वेदना होत असतील, असे आम्हाला काही जाणवले नाही. देवासमोरच्या बाटलीतला अंगारा मयुरेशने आपल्या आईच्या कपाळाला लावला. तो आणि पुष्कर बाहेरच्या खोलीत आले. दोघेही आपआपल्या मोबाईलवरून आमच्या फॅमिली डॉक्टरांना, डॉ. तुषे यांना फोन लावण्याचा प्रयत्न करू लागले. डॉक्टरांचा दवाखाना आमच्या घराच्या जवळ आहे. पण घर मात्र लांब आहे. फोन लागतच नव्हता. मी सुलभाच्या जवळच बसलो होतो. स्नेहल आणि विद्या आईच्या पाठीवरून हात फिरवित होत्या. अंगारा लावल्यानंतर तिला धाप लागल्यासारखे झाले. श्वासोश्वासाची**

**लय थोडी वाढली. दोन ते तीन मिनीटातच तिचे भान हरपल्यासारखे झाले. विद्या म्हणाली, बाबा आई कसे करते! तिला मांडीवर घ्या. सुलभाची कलती मान मी हळूच मांडीवर घेतली. तिच्या कपाळावर थोपटत होतो. तेवढ्यात तिने मान वळवली. तिच्या कपाळावरची टपोरी लालभडक टिकली बाजूला पडली होती. मी पटकन उचलून ती परत कपाळावर लावली. पण मनातून मात्र चरकलो. मला आपली लाडकी सुलभा आपल्याला सोडून गेल्याचे जाणवले. देवाचा अंगारा लावल्यानंतर एकही शब्द बोलली नाही. ब्राह्म मुहूर्त, नुकतेच उत्तरायण चालू झाले होते. तिथी होती मार्गशीर्ष शुद्ध नवमी. घड्याळात पहाटेचे पावणे चार झाले होते.**

सगळे म्हणाले, आई बेशुद्ध झाली. पटकन दवाखान्यात घेऊन जाऊ. मला पटकन काही सुचेना. माणसाची आशा मोठी वाईट असते. तिला उचलून लगतच असलेल्या हॉलमधील दिवाणावर ठेवले. आई विषण्ण चेहऱ्याने बाजूलाच बसली होती. मयुरेशने कार बाहेर काढली. सर्वांनी उचलून कसेतरी तिला कारमधे ठेवले. देह जड झाला होता. मला कल्पना होती. पण मनातून वाटत होते, सुलभाने इतक्यात आपणा सर्वांना सोडून जाऊ नये. पुष्कर-विद्या खूपच कावरे-बावरे झाले होते. लहानच ते. नुकतेच दोन वर्षांपूर्वी लग्न झालेले. अंबरनाथला स्टेशनजवळ डॉ. चिले यांच्या आदित्य नर्सिंगहोम मध्ये नेले. धाकट्या बहिणीचा मुलगा डॉ. तुषार, हा परळी-वैजनाथला प्रॅक्टीस करतो. पूर्वी डॉ. चिले यांचेबरोबर त्याने उमेदवारी केलेली. मुलांनी त्याला फोन केला. त्याने पण लागलीच फोनवर हॉस्पिटल मधल्या ड्यूटी डॉक्टरांना विनंती केली. सुलभाला हॉस्पिटलच्या आत नेले. नाडीचे ठोके लागत नव्हते. इ. सी. जी. काढला. तो ब्लँक दाखवत होता. हृदयाचे ठोके पूर्णपणे बंद पडले होते. **माझी भीति खरी ठरली. घरीच माझ्या मांडीवर तिने प्राण सोडले होते.** गोरापान सोज्वळ चेहरा, शांत आणि समाधानी

वाटत होता. सवाष्णीचे मरण तिला लाभले होते. दवाखान्यात पहाटेचे सव्वा चार झाले होते.

**सगळ्यांची लाडकी, हवीहवीशी वाटणारी सुलभा हे जग सोडून गेली होती. जातांना देवाची आठवण झाली. स्वत:हून देवाचा अंगारा मागून घेतला. देवाशिवाय इतर कोणी तिला आठवले नाही.** नवऱ्याचे सोडून द्या. पण सुना-मुले, नातवंडे यांचीपण आठवण झाली नाही. मयुरेशची मुलगी अक्षरा पाच वर्षांची. धाकटा मुलगा दोनच महिन्याचा. चार दिवसांनी बारसे होणार होते. पुष्करची गोरीपान मुलगी कस्तुरी, दीड वर्षांची. आजीचाच रंग घेऊन आली होती. तिचा खूपच लळा. सारखी तिला घेऊन बाहेर फिरवायची. कावू, चिवू, भूभू दाखवायची. जवळच रेल्वेगेटवर जाऊन गाडी दाखवायची. ती पण सारखी आजी-आजी करायची. तिला सर्व नातवंडे दादीअम्मा म्हणायचे. अगदी कामात असली तरी, कस्तुरी आजीला बाहेर न्यायला लावायची. जरा तणतणत, पण मोठ्या प्रेमाने आजी तिला बाहेर न्यायची. **एवढी सगळ्यात गुंतलेली सुलभा. पण जातांना कोणाचीच आठवण नाही. समोर यमदूत दिसल्यावर देवाचा अंगारा मागून घेतला असला पाहिजे. सद्‌गुरू पू. पू. रामकृष्ण महाराजांवर खूप भक्ती. भजनातून सद्‌गुरूंना, दत्तात्रयांना, देवीला खूप आळवायची. संत सूरदासांचा शेवटचा दिवस गोड करण्यासाठीची कन्हैयाची आळवणी आठवली. सद्‌गुरू, ह्या सर्व देव-देवता शेवटच्या क्षणी तिच्यासाठी धावून आल्या असल्या पाहिजेत. नाहीतर, असे साधू-संतांनाही दुर्लभ असलेले पवित्र मरण तिला लाभले नसते.** शेवटच्या क्षणी प्राण (चेतना) मानवी देहातून बाहेर पडतांना, त्या वासना देहाला खूप क्लेश होतात. हे आपले नसलेले शरीर सोडून जातांना जीवात्म्याला असह्य अशा मानसिक पीडा होतात. त्याला हा देहच आपला वाटतो. सोडून जाण्याची अजिबात इच्छा

नसते. कर्मबंधन सुटलेले नसते. म्हणून हा सगळा प्रपंच.

**हे सर्व डोळ्यासमोर आल्यावर, सुलभाला ही जी सद्गती लाभली. ती फक्त ह्या जन्मीच्या पुण्यामुळे नसावी. मागील कित्येक जन्माची पुण्याई घेऊन ती आली असली पाहिजे. तिला मुक्ती मिळून तिचा जन्म-मरणाचा फेरा संपला. का नाही? की सद्गती मिळून पुण्यफळ भोगण्यासाठी स्वर्गात गेली! आपल्या सामान्य माणसाच्या आकलना पलीकडील गोष्ट आहे. पण निश्चितच तिच्या कर्मबंधनाचे गाठोडे संपले जरी नसले, तरी ते खूपच हलके झाले असले पाहिजे. तिला प्राप्त झालेला ''यातनारहित सुंदर मृत्यु'' हेच दर्शवितो.**

## सुलभाच्या पार्थिवावर अंत्यसंस्कार

दवाखान्यातून सुलभाचे चेतनाहीन शरीर घरी आणले. गावातली बहीण सौ. कल्पना, तिचे यजमान, मुले सर्वजण ताबडतोब दवाखान्यात आले. इतरही सर्व जवळचे नातेवाईक घरी जमायला लागले. अशा अनपेक्षित घटनेने सर्वजण हळहळत होते. रडत होते. मलापण रडावेसे वाटत होते. पण हा अनोखा मृत्यु पाहून मन सुन्न झाले होते. ती असतांना तिचा साधेपणा, भोळेपणा, आर्थिक व्यवहाराकडे फारसे लक्ष न देणे. **त्यासाठी माझ्यावर पूर्णपणे विसंबून असणे. ह्या सर्व गोष्टींची मी चेष्टा करायचो. असा अनोखा पण पवित्र मृत्यु पाहून मी हबकून गेलो. मनातून थोडा आनंदही झाला. ज्यासाठी आपण प्रयत्नशील आहोत, ते तिने करून दाखविले. 'शी हॅज वन द रेस' हेच खरे.**

सर्व लांबच्या लोकांना फोन केले गेले. सर्वजण आल्यावर दुपारी दोन वाजता सुलभाला अंतिम यात्रेसाठी नेण्याचे ठरले. तिचे पार्थिव

घराच्या हॉलमधे ठेवले गेले. तिच्या भजनातल्या मैत्रिणी सौ. दीपा वैद्य व सौ. पिटके वहिनी शेजारीच रहातात. त्या लगेचच घरी आल्या. खूपच हळहळत होत्या. रडत होत्या. त्यांचेकडून आदले दिवशीची हकिकत कळाली. एक आठवड्यानंतर दत्तजयंती होती. रेल्वे गेट जवळच्या दत्तमंदिरात मंडळाचे नेहमीप्रमाणे भजन होते. दुपारी ४ ला भजनासाठी प्रॅक्टीस सुरू झाली. सुलभा भजनीमंडळाची संचालिका होती. त्या दिवशी खूप आनंदात दिसली. सर्व बायकांना प्रेमाने बजावून सांगितले. भजन एकदम चांगले झाले पाहिजे. कोणती भजने त्या दिवशी म्हणायची, ते ठरवले. चांगली दोन तास प्रॅक्टीस केली. सुलभाने नेहमीपेक्षा खड्या आवाजात भजने म्हटली. सगळ्यांनी पिवळ्या साड्या नेसायचे ठरले. प्रॅक्टीसनंतर सर्वजणी थोड्याफार फिरून आल्या. हे सर्व बारा तास आधी. आणि अकस्मात हे कसे झाले? **आजूबाजूच्या सर्व बायका सुलभाच्या आजूबाजूने बसल्या होत्या. लाडक्या मैत्रिणीची आठवण काढून रडत होत्या. ते सर्व पाहून इतरांच्या दु:खात भर पडत होती. सवाष्णीचे पवित्र मरण त्यांच्या मैत्रिणीला लाभले होते. त्या सर्व बायका सुलभाच्या कपाळावर कुंकवाचा मळवट भरत होत्या. रडत रडत आदरभावाने नमस्कार करीत होत्या. मनातल्या मनात देवाची प्रार्थना करीत असतील. आपल्यालाही असे भाग्य लाभावे म्हणून!**

वहिनी कविता व परळीची बहीण मंगला दोघीजणी केरळच्या यात्रेला गेल्या होत्या. बातमी समजल्यावर यात्रा अर्धवट सोडून मदुराईहून परत निघाल्या. दुसऱ्या दिवशी रात्री परत आल्या. मयुरेश, स्नेहल, पुष्कर, विद्या, पल्लवी, सुन्न होऊन सुलभाच्या आजूबाजूला बसले होते. आई बाजूलाच दिवाणावर नजर हरवल्यागत बसली होती. मी सुलभाच्या डोक्याजवळ बसून तिला एकटक न्याहळत बसलो होतो. ती पुन्हा आपल्याला कधीच दिसणार नाही. हे खरेच वाटत नव्हते. सदतीस

वर्षांपूर्वी तिला दाखविण्यास आणले होते. तो दिवस डोळ्यासमोर आला. गोरीपान, निळसर डोळ्यांची, ठेंगणी, सुबक बांध्याची सुलभा बघताक्षणीच मला आवडली होती. आमचेकडून होकार गेला होता. परंतु त्यांचेकडून स्पष्ट कळले नव्हते. **त्यावेळेस जी हुरहूर माझ्या मनास लागली होती. तिच हुरहूर परत प्रकर्षाने जाणवली. शांत, निरागस चेहऱ्याने ती झोपल्यासारखे वाटत होते. लालभडक कुंकवाच्या मळवटाने तिचे कपाळ भरून गेले होते. क्षणभर वाटले, आपण तरी कशाला रहायचे? पण ते आपल्या हातात नाही, हे लक्षात आले. आपणासही असाच देवाचे नाव घेत असतांना, त्याच्याच सान्निध्यात मृत्यु यावा. अशी उत्कट इच्छा मनात जागृत झाली. मी मनोमन तिला नमस्कार केला. हळूच कोणाचे लक्ष नाही असे पाहून, तिच्या कपाळावरच्या लालभडक कुंकवाचा एक टिळा स्वत:च्या कपाळावर लावून घेतला. जेणेकरून माझीपण ती इच्छा पूर्ण होईल. कोणास ठाऊक! माझ्या कर्मबंधनाचे गाठोडे कधी आणि कसे सुटेल ते?**

**एक गोष्ट मात्र मला प्रकर्षाने जाणवली. ह्या जन्मात मला जे पुण्यकर्माचे फळ भोगावयाचे होते. जो आनंद उपभोगायचा होता. त्यासाठीच परमेश्वराने सुलभाला माझ्या आयुष्यात पाठवले होते.** हीच परिस्थिती थोड्या-अधीक प्रमाणात आमच्या सर्व कुटुंबीयांची होती. ते सर्व संपले की काय? असे मनात आल्यावाचून राहिले नाही. माझे प्रापंचिक जीवन तिने समृद्ध केले. तसेच पारमार्थिक जीवनात संपूर्ण सहकार्य केले. किंबहुना ती घरचे सगळे सांभाळत असल्याने, मी निर्धास्तपणे गुरूगृही यल्लटीला जाऊन राहू शके. फार पूर्वीच्या काळी नवरा गेल्यांनतर स्त्रिया सती जात आणि बायको गेल्यानंतर पुरुष सन्यास घेत. सुलभाच्या निर्जीव निरागस चेहऱ्याकडे बघतांना, मला संत तुलसीदासांची रत्नावली आठवली. रत्नावली माहेरी होती. तुलसादासांना तिची ओढ असह्य झाली. मध्यरात्री

ते तिच्या घरच्या माडीवर पाईपला धरून चढून गेले. रत्नावलीला भेटले. रत्नावलीने तो पाईप बघितला, तर तो पाईप नसून भला मोठा जाडजूड असा साप होता. रत्नावलीने तुलसीदासांची निर्भत्सना केली. एवढे प्रेम त्या प्रभू रामचंद्रावर केले तर, तो तुम्हाला नक्कीच भेटेल. तुलसीदासांना उपरती झाली. रामनामात ते रंगून गेले. मग तुलसीरामायणाची निर्मिती, त्यांचे हातून झाली. **निरागस चेहऱ्याची सुलभा, जणू मला सांगत होती. माझा मोह सोडा. मी आता चालले. तुमची उन्नती करून घ्या. मी तुमच्या मार्गात अडथळा बनून रहाणार नाही. मी सारेकाही उमगलो. भरल्या डोळ्याने तिच्यापासून बाजूला झालो. पुढील व्यवस्थेची चौकशी करू लागलो.**

नातवंडे घरातून इकडे तिकडे फिरत होती. त्यांना काही समजत नव्हते. हे काय चालले आहे? आपल्या आजीला असे काय झोपवले आहे? कोठे घेऊन गेले तिला? सवाष्णीच्या सर्व शृंगारासहित मोठ्या दु:खित अंतकरणाने तिला निरोप दिला. स्मशानातून परत आल्यावर तिच्या जागी दिवा दिसला. बघितल्यावर मात्र खात्री पटली. आपल्या सर्वांची लाडकी, अजूनही हवीहवीशी वाटणारी सुलभा, आताकाही परत येणार नाही. **मनातल्या मनात खूप रडलो. बाहेरून स्थितप्रज्ञ होतो. म्हणतात ना, माणूस एकटाच जन्माला येतो आणि एकटाच जातो. पण जातांना इतरांना हुरहूर लावून जातो. कोणी कोणाचा नसतो. कसली ही पूर्वजन्मीची कर्मबंधने! पृथक दिसणाऱ्या आत्म्यांना एकत्र आणतात. सुख-दु:खाचे खेळ खेळायला लावतात. आणि मधेच विलग होतात. आपापले स्वतंत्र जीवन जगायला भाग पाडतात. ह्या कर्मगतीचा कितीही विचार केला, तरी तिचा उलगडा होत नाही. नेती नेती म्हणून सर्वकाही त्या सृष्टीच्या नियंत्यावर सोडून द्यावे लागते.**

# छोट्याश्या नातीचे आजीवरचे विलक्षण प्रेम

सगळे नातेवाईक, मित्रमंडळी, स्नेही भेटायला येत होते. सर्वांच्या तोंडी एकच विषय. हे सर्व झालेच कसे? मयुरेशच्या मुलाचे बारसे दि. २६-१२-२०१२ रोजी करण्याचे ठरविले होते. सुलभाचा उत्साह दांडगा होता. सगळी तयारी करीत होती. मृत्युच्या आदल्या दिवशीच बहुतेकांना बारश्याचे आमंत्रण फोनवरून केले. त्या निमित्ताने सगळ्यांशी बोलणे झाले. त्याचीच हळहळ प्रत्येकाच्या बोलण्यावरून जाणवत होती. **माणसाचे आयुष्य आकाशातील एखाद्या ढगासारखे आहे. वाऱ्याच्या झोताने तो कधी नाहीसा होईल! हे सांगता येत नाही. म्हणून जगण्याच्या प्रत्येक क्षणाचे सोने करावे. ते चांगल्या वर्तणूकीने, परोपकाराने आणि भगवंताच्या नामस्मरणाने. हेच खरे.**

सुलभाचा फोटो, मोठा करून फ्रेम करण्यास टाकला होता. तो आठ दिवसांनी मिळाला. दिव्याच्या शेजारी पाटावर ठेवला. खूपच छान, हसरा फोटो. प्रत्येकाकडे बघून हसते आहे असे वाटते. सोडून जाण्याच्या दु:खाचा लवलेशही जाणवत नाही. **वैराग्य म्हणजे हेच. पाण्यात राहून न भिजणाऱ्या कमळाप्रमाणे. संसारात राहून, त्यात रमल्यासारखे दिसल्याप्रमाणे. पण मनातून विरक्त असल्याप्रमाणे. भगवत्‌भक्ती करणारे. तेच मनाचे वैराग्य शेवटचा क्षण गोड करते. हे सुलभाने दाखवून दिले.** जाता-येता सारखे त्या फोटोकडे पाहावेसे वाटे. आमची धाकटी नात. कस्तुरी. पुष्करची मुलगी. फक्त दीड वर्षांची. आजीसारखीच गोरीपान. तिला फारच आजीचा लळा होता. आणि आजीला पण तिचा. तिला सुलभाचा फोटो दिसला. आठ दिवस आजी दिसली नव्हती. नजर आजीला शोधत होती. पण सांगता येत नव्हते. आजीला सारखी बाहेर न्यायला लावायची. **कस्तुरीचे फोटोकडे लक्ष गेले. मी**

**बाजूलाच बसलो होतो. ती हळूच पुढे गेली. फोटोसमोर बसली. तिच्या चेहऱ्यावरचे भाव मनाला चटका लावून जाणारे. मी बघत बसलो. कस्तुरी दोन मिनीटे फोटोकडे एकटक बघत बसली. हळूच आपला हात पुढे केला. पहिले बोट फोटोला लावले. स्पर्श होताच ओळख पटली आणि खुदकन हसली. आजी-आजी म्हणून मला दाखवू लागली. तिच्या चेहऱ्यावरचा आनंद विलक्षण होता. खरोखर आजी भेटल्याचा तो आनंद. पाहूनच मला भरून आले. पटकन आपले तोंड पुढे करून तिने फोटोची पापी घेतली.** बाकी जवळ पास असलेली घरातील मंडळी कस्तुरी भोवती जमा झाली. सर्वांना आजी-आजी म्हणून फोटोकडे बोट दाखवू लागली. फोटोपासून बाजूलाच होत नव्हती. तिच्याकडे बघून सर्वांना गहीवरून आले. **एवढी छोटीशी मुलगी. आजीचा अल्पसा सहवास. पण केवढे हे प्रेम. अगदी हृदयाच्या आतून उसळून वर आलेले. ह्या जन्मीच्या एवढ्याशा अल्प सहवासाने, इतक्या लहान वयात हे निर्माण होणे शक्य नाही. काहीतरी पूर्वजन्मीचे ऋणानुबंध असले पाहिजे, हे नक्की.** लहान भाऊ सतीश. दीर्घ आजाराने दोन वर्षांपूर्वी त्याचे निधन झाले. त्याच्यासारखाच हुबेहूब दिसणारा दोन वर्षांचा नातू अर्णव. त्यालापण दादीअम्माचा खूप लळा. सुलभा गेल्यानंतर दोन रात्री झोपलाच नाही. सारखा हट्ट करीत होता. दादीअम्माकडे जायचे म्हणून. त्याची आई पल्लवी. ती कसे समजवणार त्याला?

घरातील वयस्कर माणसे जातांना, नातवंडांच्या रूपाने आपल्या स्मृती ठेवून जातात. असे म्हणतात. बऱ्याच वेळा त्याचे प्रत्यंतर येते. आजीसारखी दिसणारी, वागणारी नात. आजोबांसारखा हुबेहूब नातू. सृष्टीच्या ह्या अजब खेळाचा विचार करू लागलो की, त्या परमेश्वराचे कौतुक केल्यावाचून रहावत नाही. कर्मबंधन, पुनर्जन्म वगैरे थोतांड मानणाऱ्या, स्वत:ला आधुनिक समजणाऱ्या नास्तिक माणसाला पण अशा प्रकारच्या घटना विचार करायला लावतील. आम्ही सर्वजण वेद-

पुराणांवर विश्वास असणारे. सुलभाचे क्रिया -कर्म शास्त्राप्रमाणे व्यवस्थित करण्याचे ठरवले. पत्नीच्या क्रिया-कर्माचे अधिकार मला नव्हते. मोठा मुलगा म्हणून आईचे सर्व क्रिया-कर्म मयुरेशने व्यवस्थित मनापासून केले. अगदी नवव्यापासून चौदाव्या दिवसापर्यंत. सुदैवाने ह्यासाठी विद्वान ब्राह्मणपण मिळाले.

दहाव्या दिवशी काकस्पर्शाचा विधी असतो. माणसाचे निधना समयी त्याचा आत्मा देहातून बाहेर पडतो, तो वायुरूपाने. देहातून चेतना बाहेर पडल्यावर, त्या देहाला प्रेत ही संज्ञा प्राप्त होते. मृत्युसमयी माणसाच्या ज्या वासना तीव्र असतात. त्या घेऊनच प्रेतात्मा वायुरूपाने देहातून बाहेर पडतो. पुढे त्याप्रमाणे त्याला गती मिळते. मृत शरीरातून बाहेर पडल्यावर प्रेतात्म्याला खूप दु:ख होते. तो सूक्ष्म रूपाने आपल्या मृत देहाभोवतीच फिरत असतो. म्हणून लवकरात लवकर प्रेताला अग्नीसंस्कार किंवा दहनसंस्कार करण्याची पद्धत आहे. दहा दिवस तो आपल्या प्रिय जनांच्या आसपास घोटाळत असतो. त्यानंतर तो आपल्या परलोकातील प्रवासास निघतो. म्हणूनच दहाव्याचा विधी करण्याची पद्धत हिंदूमधील प्रत्येक जातीत वेगवेगळी आहे. तशाच प्रकारची काहीशी पद्धत इतर धर्मपंथात पण आहे.

दहाव्यासाठी पिंडाच्या नमस्काराला जवळचे बहुतेक नातेवाईक बदलापूरच्या उत्तरवाहिनी असलेल्या उल्हासनदीच्या तिरावर जमले होते. तेथे स्मशानघाटावर तशी व्यवस्था आहे. स्त्रिया पण होत्या. दोन्ही नातींवर खूप जीव असलेली सुलभा. म्हणून आम्ही मुद्दामून दोन्ही नातींना, अक्षरा (वय वर्षे पाच) व कस्तुरी (वय वर्षे दीड) यांना बरोबर घेऊन गेलो होतो. कदाचित नातींमध्ये जीव अडकलेला सूक्ष्म देह. कावळ्याला पिंडास स्पर्श करण्यास अटकाव करील. शास्त्राप्रमाणे गाय व कावळा यांना सूक्ष्मदेहाचे ज्ञान असते. ते सूक्ष्म देह त्यांना दिसतात. **पिंड काकस्पर्शासाठी ठेवल्यावर, सूक्ष्म देह बाजूलाच असतो. तो असेपर्यंत कावळा पिंडाला चोच लावत नाही. बऱ्याच वेळा**

**कावळे येऊन पिंडाच्या आजूबाजूला फिरतात. पण स्पर्श करीत नाहीत. मग नातेवाईक वेगवेगळ्या तऱ्हेने प्रार्थना करून मृत व्यक्तिच्या राहिलेल्या इच्छा पूर्ण करण्याचे वचन देतात. त्या मृत व्यक्तिचे म्हणजेच त्याच्या सूक्ष्म देहाचे समाधान झाले की, तो लगेचच आपल्या परलोकातील पुढच्या प्रवासाला निघून जातो. मग तेथे असलेला कावळा, पिंडाला स्पर्श करतांना दिसतो.** साधारण पणे त्यावेळेस मृत व्यक्तिला गती मिळाल्याचे समजले जाते. खरे म्हणजे तो येथील वास्तव्य सोडून परलोकातील प्रवासास निघतो. जर का बराच वेळ कावळ्याने पिंडाला स्पर्श केला नाही तर, शास्त्राप्रमाणे दर्भाचा कावळा तयार करून त्याचा स्पर्श पिंडाला करतात. मग पुढचे विधी करता येतात. ह्या ठिकाणी मृत व्यक्तीची इच्छा-वासना राहून जाते. नातेवाईकांना जरी पूर्तता करण्याची इच्छा असली तरी, ती न कळल्याने असे होते. **मृत व्यक्तीचा सूक्ष्म देह आपल्याला दिसत नाही. बोलू पण शकत नाही. म्हणूनच दहाव्या दिवसाच्या काक स्पर्शाच्या विधीला महत्त्व आहे. त्यातील मर्म समजावून घेतले पाहिजे. न दिसणारे ते सर्व खोटे, म्हणून पळवाट काढणे योग्य नाही.**

सुलभाच्या मृत्युसमयीच्या अनोख्या प्रसंगाने तिला सद्‌गती मिळाली, अशी मला खात्री वाटत होती. तरीपण ते स्पष्टपणे कळणे. आपल्या आवाक्याबाहेरचे. म्हणूनच अक्षरा व कस्तुरीला नेण्याचा अट्टाहास मी केला. मुलांनी व सुनांनी त्याला अनुमती दिली. सर्वांचीच इच्छा तिला सद्गती मिळावी, अशीच होती. गुरूजींनी पिंडाचे विधी उत्तम रितीने पार पाडले. त्यातले तंत्र आणि मंत्र दोघांचेही विश्लेषण त्यांनी केले. पिंडाला सर्वांनी नमस्कार केला. आम्ही प्रार्थना केली. आम्ही सर्व तुझ्या इच्छेप्रमाणे वागू. तरी तू येथे आसक्ती ठेवू नकोस. आनंदाने परलोकीच्या प्रस्थानास सुरवात कर. काहीही त्रास न होता, तो दयाळू परमेश्वर तुला भवसागर पार करून नेईल. मयुरेशने पिंड

हातात घेऊन समोरच्या भिंतीवर ठेवला. परत एकदा मी, मयुरेश, पुष्कर, दोन्ही सुना व नातींनी पिंडाला नमस्कार केला आणि मागे वळलो. थोडे दूर जाऊन उभे राहावे म्हणून. **मागे वळून पिंडाकडे बघतो तर काय? तीन कावळे पिंडाभोवती बसून स्पर्शच काय? तर तो पिंड सावकाशपणे खात होते. आमचे सर्वांचे डोळे पाणावले. माझी तर खात्री पटली. तिला मोक्ष म्हणा किंवा सद्गती तरी नक्कीच प्राप्त झाली. तिचा सूक्ष्म देह प्राण जाता क्षणीच परलोकाच्या प्रवासाला निघून गेला. दहा दिवस पण आमच्या भोवती घोटाळला नाही. ती गेल्यानंतरपण घरातले वातावरण शांत वाटत होते.**

आज महिना होऊन गेला. पण रोजच तिची आठवण होते. छोटी कस्तुरी तर, दिवसातून तीन चार वेळा आजीचा फोटो काढायला लावते. त्याच्याशी हसत-खेळत बसते. आजी प्रत्यक्ष भेटल्याचा आनंद तिच्या चेहऱ्यावर असतो. **काय असतील हे ऋणानुबंध? पूर्वजन्मीच्या कर्मबंधनाच्या गाठी सैल करण्यासाठी एकत्र आलेलो आम्ही सर्वजण. ह्या जन्मी त्या गाठी सैल करायच्याच. सगळ्यांशी चांगले वागायचे. परमेश्वराची भक्ती करायची. त्यासाठी सुलभाच्या पवित्र आत्म्याला विनम्र होऊन प्रणाम करावासा वाटतो. आम्ही जर गैर मार्गाला लागून, कर्मबंधनाच्या गाठी वाढवायला लागलो. तर नक्कीच तिचा पवित्र आत्मा आमच्या सहाय्याला धावून येईल. आम्हाला त्यापासून परावृत्त करील.**

सुलभाच्या विलक्षण अशा मृत्युने माझे मन भारावून गेले होते. तिच्या विरहाचे दु:ख करावे! का अनोख्या मृत्युचा आनंद मानावा? असंख्य विचारांची गर्दी मनात दाटली होती. सद्गुरूंकडून नामबोध. त्यानंतर साधना. विविध विषयांवरचे वाचन. त्यावर मूळात असलेली विचार करण्याची प्रवृत्ती. सद्गुरूंचे वेळोवेळी मार्गदर्शन. त्यामुळे ह्या सर्व विचारांचे मंथन मनात चालले होते. त्या सर्व विचारांना दृष्य स्वरूपात

आणण्यासाठी माझे मन, मला प्रवृत्त करीत होते. दहा दिवसात गरूडपुराण वाचले. शास्त्र लक्षात आले. सद्गुरूंना मनोमन नमस्कार करून लिहिण्यास सुरवात केली. भरामर सुचत गेले. त्याचाच परिपाक म्हणजे हे छोटेसे पुस्तक '**कर्मबंधन.**' एक वेगळा विषय माझ्याकडून हाताळला गेला. सद्गुरूंचे आशीर्वाद त्याला आहेच. त्याच्या शिवाय मी काहीच करू शकत नाही.

- समाप्त -

॥ स. स. नरसिंहेश्वर महाराज की जय॥

॥ सद्गुरू माऊली रामकृष्ण महाराज की जय॥

# आई

नऊ महिने... वात्सल्याचे
स्वत:शीच झगडतात,
‘आई’ नावाच्या तत्त्वाला
पृथ्वीवर आणतात॥१॥

या जगात जन्माला येणं
हे असं निसर्गत:च घडतं,
‘आई’ पासून वेगळं झालो म्हणूनच
तान्हं बाळ पहिल्यांदा रडतं॥२॥

त्या तान्ह्या बाळाचं
सगळच कित्ती सोप्पं असतं
कारण, त्याच्यापाशी ‘आई’ नावाचं
एकच परिपूर्ण उत्तर असतं॥३॥

पुढे प्रत्येक पावलागणिक
ते मूल धडपडतं
‘आई गं...’ अशा हुंदक्याशिवाय
त्याचं सारं जीवनच अडतं॥४॥

संभ्रमावस्थेत त्या मुलाचे
अवसानच गळते
त्यावेळी त्याच्या मनाची घालमेल
केवळ ‘आई’ लाच कळते ।।५।।

संकटांना सामोर जाताना
जीवनात कधी कधी सारेच संपते
तावून सुलाखून ‘आईच्या संस्कारांची’
शिदोरी तेवढी उरते. ।।६।।

‘तीच’ शिदोरी घेऊन
मी जीवनात पुढे पुढे चालतो
‘आई’ नावाच्या मंत्राचे
अखंड नामस्मरण करतो ।।७।।

**प्रिय प्रेमस्वरूप आईस सादर समर्पण.**

**- मयुरेश जयंत भडंग**



# प्रिय वहिनी

अचानक झाकोळून यावे अन् रस्ताच व्हावा दिसेनासा ।
एक सुखद शिडकावा निरंतर प्रेमाचा बघता बघता झाला पारखा ॥१॥

पटकन घेतली ‘एक्झिट’ आणि चुटपूट जीवा लागली ।
खूप होते बोलायचे राहूनच गेले आता ते अंतरी ॥२॥

असणे आणि नसणे यात फरक फक्त एका अक्षराचा ।
भाव मात्र भिडतो मनां, ठाव घेतो हृदयाचा ॥३॥

काय म्हणू मी, होती नात्यातील एक वेगळीच वीण ।
‘वहिनी’ पेक्षा ही होती जवळची एक माझी मैत्रीण ॥४॥

गोऱ्या रंगाला होती निर्मळ हास्याची किनार ।
शांत पण मिश्कील बोलण्याची ढब होती खास ॥५॥

हौस मौजेला होता रसिकतेचा बाज, कर्तव्याची पुरेपूर जाण ।
साऱ्या कुटुंबाला घेत सामावून चालली होती समंजस वाटचाल ॥६॥

गळ्यात आणि ओठांवरही होता गोडवा ।
समर्पक साथीचा सूरही होता खासच असा ॥७॥

आनंदाचा हा ठेवा घेतलास ईश्वरा तू तुजकडे ।
पण आठवणी हक्काच्या अमुच्या राहतीलच त्या आमच्याकडे ॥८॥

**ओंजळ ही शब्दफुलांची... एक आठवण मायेची.**

**सुरेशर्वरी**





लेखक : श्री. जयंत पं. भडंग (वय ६४ वर्षे)

## परिचय

व्यवसायाने इलेक्ट्रिकल इंजिनियर. ४२ वर्षे नोकरी नंतर सेवानिवृत्त. सध्या वास्तव्य कल्याणजवळील अंबरनाथ येथे. प्रथमपासून आध्यात्माची आवड. आध्यात्मिक पुस्तकांचे भरपूर वाचन व मनन. ३८ व्या वर्षी प.पू. रामकृष्ण महाराजांचे दर्शन व अनुग्रह प्राप्ती. चोवीस तास बंधनाची नोकरी; पण त्यातही वेळ काढून नियमीत साधना. सेवानिवृत्ती नंतर लगेचच सद्‌गुरु प.पू रामकृष्ण महाराजांच्या अलौकिक जीवन चरित्राचे म्हणजे **भक्तयोग्याची आनंदसाधना** ह्या पुस्तकाचे लेखन व प्रकाशन, ३ जुलै २०१२ रोजी. सद्‌गुरुंच्या कृपेने पहिलेच पुस्तक; तेही एका इंजिनियरच्या माध्यमातून.

प्रपंचात राहूनही परमार्थ साधता येतो, ही सद्‌गुरुंची शिकवण अंमलात आणली. त्यांच्या कृपेने मुमुक्षु ते साधक असा आजपर्यंतचा प्रवास. आयुष्यातील एका कठीण प्रसंगाला तोंड देण्याची वेळ नुकतीच त्यांचेवर आली. त्या निमित्ताने गुरुड-पुराणाचे वाचन झाल्यामुळे लेखकाचे संवेदनशील मन जागे झाले. कर्मबंधनाच्या शास्त्राचा अभ्यास करून सद्‌गुरूकृपेने त्यांच्या हातून नाजूक पण, परमार्थाचा पाया असणारा विषय हाताळला गेला आणि **‘कर्मबंधन’** ह्या पुस्तकाचे वीस दिवसात लिखाण झाले. जिच्या प्रेरणेतून ह्या पुस्तकाची निर्मिती झाली त्या लेखकाच्या प्रिय पत्नी वै. सुलभा भडंग यांच्या पवित्र आत्म्यास हे पुस्तक समर्पण.



**सुविद्या प्रकाशन**

१४९, शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०

☎ ऑफिस : २४४५४८१३, मो. ९८८१०६५८१७